# श्रीमद्भागवत–माहात्म्य

## अध्याय १ ला

सत्, चित् व आनंद अशीं स्वरूपें धारण करणाऱ्या व जगाची उत्पत्ति आदि करण्यास कारणीभूत असणाऱ्या आणि आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक अशा तीनहि तापांचा नाश करणाऱ्या श्रीकृष्णाला आम्ही नमस्कार करितों. ॥ १ ॥ जो सर्वसंग-परित्याग करून निघून जाण्यास तयार झाला होता व ज्याचे उपनयनादि संस्कार झाले नव्हते अशा ज्याला व्यासमुनि पुत्रविरहानें पीडित होऊन 'हे पुत्रा !,' असें म्हणून हाक मारूं लागले त्या वेळीं शुकाचार्यरूप बनलेले ते सर्व वृक्ष "ओ ३" म्हणून व्यासांना प्रत्युत्तर देते झाले. त्या सर्व कर्मांपासून परावृत्त झालेल्या सर्व प्राण्यांच्या हृदयांत आत्मरूपानें राहणाऱ्या श्रीशुकाचार्यांना मी नमन करीत आहें ॥ २ ॥

नैमिषारण्यामध्यें भगवत्कथामृताच्या रसाचा आस्वाद घेण्यांत कुशल असा शौनक मुनि आसनावर बसलेल्या महाबुद्धिवान् अशा सूताला वंदन करून विचारूं लागला ॥ ३ ॥

शौनक म्हणतात --हे सूता, आपलें ज्ञान कोट्यवधि सूर्याप्रमाणें तेजस्वी असल्या-मुळें आपण अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करणारे आहां; करितां ज्याच्या योगें भक्ति, ज्ञान व वैराग्य मिळवून देणाऱ्या मोठ्या विवेकाची वाढ होते, असें माझ्या कर्णेंद्रियांना रसायनाप्रमाणें तृप्त करणारें भगवद्गुणकथांचें सार आम्हांला सांगा. त्याचप्रमाणें वैष्णव लोक मायिक मोहाचा नाश कसा करितात हेंही सांगा ॥ ४, ५ ॥ ह्या भयंकर कलियुगामध्यें जीव हा बहुतेक विषयलंपट होऊन दुःखी झालेला आहे. तेव्हां या दुःखित जीवाचें दुःख दूर करण्यास समर्थ असणारें असें कोणतें बरें श्रेष्ठ साधन आहे? ॥ ६ ॥ तुम्ही मला ज्यायोगें आत्यंतिक कल्याण होईल व जें पवित्र वस्तूंमध्यें अत्यंत पवित्र आहे व ज्यायोगें श्रीकृष्णाची चिरकालिक प्राप्ति होते असें

एखादें श्रेष्ठ साधन सांगा ॥ ७ ॥ चिंतामणि हा ऐहिक सुख देतो, कल्पवृक्ष स्वर्गीय संपत्ति देतो, त्याचप्रमाणें प्रसन्न झालेला गुरु योग्यांनाहि मिळविण्यास कठीण अशा विष्णुलोकाची प्राप्ति करून देतो ॥ ८ ॥ सूत म्हणतात, हे शौनका, तुझ्या अन्तःकरणांत भगवद्विषयक प्रेम उत्पन्न झाल्यामुळें मीं योग्य विचार करून, जें संपूर्ण सिद्धांतापासून निष्पन्न झालें आहे व ज्याच्या श्रवणानें संसाराचें भय नाश पावतें, ज्यायोगें भक्तिरसाच्या प्रवाहाची वाढ होते व जें श्रीकृष्णाला संतोष देण्यास कारणीभूत आहे, तें मी तुला सांगतों; स्वस्थ अन्तःकरणानें श्रवण कर ॥९, १० ॥ श्रीमद्भागवत नामक शास्त्र हें काळरूपी अजगरानें गिळलेल्या प्राण्यांना त्यांतून मुक्त करून त्यांचें सांसारिक दुःख नाहींसें करण्यास कारणीभूत असें आहे व हें शास्त्र कलियुगांत शुकानें वर्णन करून सांगितलें आहे ॥ ११ ॥ अन्तःकरणशुद्धि होण्यास ह्याच्याखेरीज दुसरें कोणतेंहि साधन अस्तित्वांत आलेलें नाहीं. जर पूर्वजन्मीं आपल्या हातून कांहीं पुण्य घडलें असेल तरच आपणांस ह्या भागवतश्रवणाचा लाभ होईल ॥ १२ ॥ शौनका, एके समयीं शुकाचार्य परीक्षित् राजाला भागवतकथा सांगण्यासाठीं सभेमध्यें बसले असतां सर्व देव त्याच ठिकाणीं अमृतकलश घेऊन आले ॥ १३ ॥ आपापल्या कार्यांत कुशल असे ते देव शुकाचार्याला नमस्कार करून म्हणूं लागले कीं, " हे शुकाचार्या, हा अमृताचा कलश घेऊन त्याच्या मोबदल्यांत कथारूपी अमृत आम्हांला द्या. याप्रमाणें अमृताची अदलाबदल झाली असतां परीक्षित् राजाला अमृत पिण्यास मिळेल व आम्हांला श्रीमद्भागवतकथारूपी अमृत पिण्यास संधि लाभेल ! " ॥ १४॥ ॥ १५ ॥

'भगवंताची कथा व स्वर्गीय अमृत ह्यांच्यामध्यें महदंतर आहे. ज्याप्रमाणें काचेची मोठमोठ्या रत्नांशीं तुलना करणें वेडेपणाचें आहे, त्याचप्रमाणें अमृताची कथेशीं तुलना करणें होय. कथा ही अमृतापेक्षां किती तरी पटींनीं श्रेष्ठ आहे.' याप्रमाणें विचार प्रगट करून शुकाचार्य देवांना हसूं लागला ॥ १६ ॥ शुकाचार्यानें विचार केला कीं, ' हे देव भगवंताची खरी भक्ति करणारे नसून नास्तिक आहेत; तेव्हां ह्यांना भागवत–कथारूपी अमृत देणें अयोग्य होय. ' असा विचार करून त्यानें त्यांना कथामृत दिलें नाहीं. तात्पर्य, ही श्रीमद्भागवतकथा देवांनाहि दुर्लभ अशी आहे ॥ १७॥ परीक्षित् राजाला ही कथा ऐकून मोक्षप्राप्ति झाली, असें पाहून ब्रह्मदेवादि देवांना पूर्वी अत्यंत आश्चर्य वाटलें. ब्रह्मदेवानें एके दिवशीं सत्यलोकीं तागडीमध्यें एका पारड्यांत भागवतकथा व दुसऱ्या पारड्यांत इतर मोक्षप्रापक साधनें घालून उभयतांची तुलना केली. त्या वेळीं इतर साधनें हलकीं ठरून भागवतकथा ही वजनानें जास्ती भरली ! त्या वेळीं सर्व ऋषिसमाजाला फारच आश्चर्य वाटलें ॥ १८ ॥१९॥ कलियुगामध्यें हें भागवतशास्त्र म्हणजे साक्षात् भगवंताचें स्वरूपच होय, असें सर्व ऋषि मानिते झाले. या भागवताचें पठण व श्रवण केलें असतां तात्काळ विष्णुलोकाची प्राप्ति होते ॥२७॥ तसेंच, हें भागवत सात दिवसांत सांग संपूर्ण वाचिलें असतां मोक्षप्राप्ति होते. पूर्वी

दयाळू अशा सनकादि ऋषींनीं हें भागवत नारदऋषीला सांगितलें होतें ॥ २१ ॥ नारदानें जरी हें भागवत त्याच्याहि पूर्वी ब्रह्मदेवाच्या तोंडून ऐकिलें होतें, तरी भागवतसप्ताहविधि त्याला सनाकादिकांनींच सांगितला ॥२२॥

शौनक म्हणतात, लौकिक संबंधापासून मुक्त झालेल्या व एका जागीं कांहीं काळहि स्वस्थ न राहणाऱ्या नारद ऋषीला भागवतसप्ताहविधि श्रवण करण्याविषयीं प्रेम कसें उत्पन्न झालें व त्याचा सनत्कुमारादिकांशीं समागम कसा झाला हें आम्हांला सांगा ॥ २३ ॥

सूत म्हणतात, मी शुकाचार्यांचा फारच आवडता पट्टशिष्य असल्यामुळें त्यांनीं मला हें गुह्य कथानक विचारपूर्वक सांगितलें व तेंच भक्तियुक्त असें कथानक मी आतां येथें तुम्हांला सांगणार आहें ॥ २४ ॥ एके दिवशीं निष्पाप असे सनकादि चार ऋषि, साधूंचा समागम घडावा म्हणून बदरिकाश्रमांत गेले. त्या ठिकाणीं त्यांनीं नारद ऋषीला पाहिलें ॥ २५ ॥

सनकादि कुमार नारदाला म्हणाले–“ हे देवर्षे नारदा, तुझें मुख असें दीनवाणें कां बरें झालें आहे? तूं इतका चिंतामग्न कां बरें दिसतोस ? तुम्ही आलांत कोठून ? इतक्या घाईघाईनें चाललां आहां कोठें ? ॥ २६ ॥ ज्याप्रमाणें द्रव्य हरवलेला मनुष्य अस्वस्थचित्त असतो, त्याप्रमाणें तूं अस्वस्थचित्तसा दिसतोस. सर्वसंगपरित्याग केलेल्या तुझ्यासारख्या मुक्ताची अशी स्थिति होणें योग्य नव्हे. तेव्हां असें कां झालें तें सांग ” ॥ २७ ॥

नारदऋषि म्हणतात, ' कुमार हो ! सर्वांहून पृथ्वी ही अत्यंत श्रेष्ठ आहे असें जाणून मी पृथ्वीवर गेलों. तेथें पुष्कर, प्रयाग, काशी, गोदावरी, हरिक्षेत्र, कुरुक्षेत्र, श्रीरंगपट्टण, सेतुबंध रामेश्वर वगैरे तीर्थक्षेत्रांचे ठिकाणीं या क्षेत्राहून त्या क्षेत्राला याप्रमाणें सर्वत्र भटकलों; परंतु मनाला समाधानकारक असें सुख मिळालें नाहीं. कारण, सांप्रत ही पृथ्वी अधर्माचा मित्र अशा कलीनें अगदीं त्रस्त करून सोडिली आहे ॥ २८ ॥ २९ ॥ ॥ ३० ॥ ह्या पृथ्वीवर सत्य नाहीं. तपश्चर्या, पावित्र्य, दया व दान ह्यांचें तर बिलकुल नांव सुद्धां नाहीं. सर्व लोक दीन, कपटी व खोटी साक्ष देणारे, पोटभरू, आळशी, मंद बुद्धीचे, दुर्दैवी, तसेंच अनेक रोगांनीं पीडिलेले, नास्तिक, पाखण्डी व परिवारासह विषयासक्त असे झाले आहेत ॥ ३१ ॥ ३२ ॥ घरांत तरुण पत्नीचें प्राबल्य व पत्नीचा भाऊ ( मेहुणा) हा मसलतगार. तसेंच द्रव्य घेऊन कन्याविक्रय करणारे लोक जिकडे तिकडे झाले असून घरोघर पतिपत्नींमध्यें भांडणें होत आहेत ॥ ३३ ॥ धर्मभ्रष्ट यवनांनीं सर्व आश्रम, तीर्थें, तसेंच नद्या व्यापून टाकिल्या असून पुष्कळशा ठिकाणीं कित्येक देवळें मोडून फोडून टाकिलीं आहेत ॥ ३४ ॥ त्या भूलोकीं योगसाधन करणारा एकहि नाहीं. सिद्ध नाहीं,

ज्ञानी नाहीं; चांगलीं कृत्यें करणारा एकहि नाहीं. आज सर्व मोक्षदायक साधनें कलिरूप पेटलेल्या वणव्यानें जळून भस्म झालीं आहेत ॥ ३५ ॥ सर्व देश अन्नविक्रय करणारे झाले आहेत. सर्व ब्राह्मण वेदविक्रय करूं लागले आहेत. स्त्रिया वेश्या बनल्या आहेत. अशा प्रकारची स्थिति पृथ्वीवर उत्पन्न झाली आहे ॥ ३६ ॥ याप्रमाणें कलियुगामुळें उत्पन्न झालेली ही जगाची दोषयुक्त परिस्थिति अवलोकन करीत फिरत असतां पृथ्वीवर ज्या ठिकाणीं भगवंतानें कृष्णावतारीं अनेक क्रीडा केल्या, त्या यमुनाकांठच्या प्रदेशांत प्राप्त झालों ॥ ३७ ॥ अहो सनकादि मुनि हो ! त्या ठिकाणीं येतांच एक आश्चर्यकारक गोष्ट मीं पाहिली, ती सांगतों ऐका. त्या यमुनाकाठच्या प्रदेशांत एक खिन्न अंतःकरणानें बसलेली तरुण स्त्री मीं पाहिली ॥ ३८ ॥ त्या स्त्रीच्या दोन बाजूंस निश्चेष्ट पडलेले दोन वृद्ध दिसत होते. त्यांचा फक्त श्वासोच्छ्वास मात्र चालू होता. ती स्त्री त्या दोघां वृद्धांची सेवा करून त्यांना जागे करण्याचा प्रयत्न करीत होती व रुदन करीत होती ॥ ३९ ॥ ' आमच्या शरिराचें कोणी रक्षण करणारा आहे काय ? ' असा विचार करीत कावरीबावरी होऊन ती दाही दिशांचे ठिकाणीं पाहत आहे असें दिसत होतें. त्या तरुण स्त्रीच्या सभोंवार शेंकडों स्त्रिया बसलेल्या असून त्या तिला वारंवार वारा घालीत होत्या व तिला शुद्धीवर आणण्याचाहि प्रयत्न करीत होत्या ॥ ४० ॥ हा सर्व प्रकार लांबूनच प्रथम पाहिला व नंतर मी मोठ्या कौतुकानें त्यांच्याजवळ गेलों. मला पाहतांच ती तरुण स्त्री तात्काळ उठून उभी राहिली व दुःख करीत बोलूं लागली ॥ ४१ ॥

भक्तिनामक ती तरुण स्त्री म्हणते –" सत्पुरुषा नारदा, क्षणभर उभा राहा व माझी चिंता दूर कर. तुझें दर्शन प्राण्यांचें सर्व प्रकारचें पाप खात्रीनें नाहींसें करणारें आहे ॥ ४२ ॥ बहुतकरून तुझ्या उपदेशानें माझ्या दुःखाची शांति होईल असें मला वाटतें. आपल्यासारख्या साधूचें दर्शन ही मोठ्या भाग्याची गोष्ट होय. भाग्यावांचून ती घडत नाहीं " ॥ ४३ ॥

भक्तीचें हें भाषण ऐकून मी तिला म्हणालों—' तूं कोण आणि हे दोघे कोण ? तसेंच प्रफुल्लित कमळासारखे डोळे असणाऱ्या ह्या सुंदर स्त्रिया कोण आणि तुला दुःख होण्याचें कारण काय हें सर्व मला विस्तारपूर्वक सांग ! ' ॥ ४४ ॥

ती स्त्री म्हणाली—मी भक्ति या नांवानें प्रसिद्ध असून, हे काळाच्या तावडींत सांपडून जर्जर झालेले ज्ञान व वैराग्य नांवांचे माझे दोन मुलगे आहेत. ॥ ४५ ॥ तसेंच माझी सेवा करीत असलेल्या ह्या ज्या स्त्रिया आपणाला दिसत आहेत त्या गंगादि नद्या होत. यद्यपि या माझ्या सेवेकरितांच येथें आल्या आहेत व सर्व देवहि माझी सेवा करण्यास उद्युक्त झाले आहेत, तरी सुद्धां त्यायोगें माझें कल्याण होईलसें मला वाटत नाहीं ॥ ४६ ॥ हे नारदा, आतां मी माझ्याबद्दल जी कांहीं हकीकत तुला सांगणार आहें, ती तूं स्वस्थचित्त होऊन श्रवण कर. ती हकीगत फारच विस्तृत आहे. ती ऐकून तूं सुखी होशील

॥ ४७ ॥ माझें नांव भक्ति. मी द्रविडदेशांत उत्पन्न झालें व कर्नाटकांत वाढल्यें. महाराष्ट्रांतहि माझी थोडी वाढ झाली; परंतु गुजराथेंत मात्र मला जीर्णावस्था प्राप्त झाली ॥ ४८ ॥ त्या गुजराथ प्रांतांत, भयंकर कलियुग सुरू झाल्यामुळें पाखंडी व नास्तिक लोकांनीं माझ्या शरिराचे तुकडे तुकडे उडवून टाकिले. मी पुत्रांसह पुष्कळ काळपर्यंत निर्बळ झाल्यें आणि माझा जोरहि अगदीं कमी झाला ॥ ४९ ॥

मी पुन्हां वृन्दावनाला गेल्यें तेव्हां मात्र मला लावण्य प्राप्त झालें. हल्लीं मी तरुण, सुंदर व सुस्वरूप झाल्यें आहे ॥ ५० ॥ परंतु हे माझे दोन मुलगे मात्र श्रमानें थकून जाऊन येथें निजून राहिले आहेत. मी आतां हें स्थान सोडून परदेशांत जाणार आहें ॥ ५१ ॥ हे माझे दोन मुलगे वृद्धावस्थेला प्राप्त झाल्यामुळें त्यांचें दुःख पाहून मला फार दुःख होत आहे. मला तारुण्य व माझ्या पुत्रांना वार्धक्य अशी अवस्था प्राप्त होण्याचें कारण काय, तें कांहीं समजत नाहीं ॥ ५२ ॥ आम्हीं तिघेंहि एकत्र राहत असतांना आमच्या अवस्थेंत असा हा विपरीतपणा कोठून आला ? माता वृद्ध व मुलगा तरुण असणें हें संभवनीय आहे; परंतु आमच्यामध्यें याच्या उलट प्रकार आहे ॥ ५३ ॥ हा उलट प्रकार पाहून मी स्वतःबद्दल शोक करीत आहें. हे बुद्धिमंता योगेशा नारदा, असें होण्याचें कारण काय असावें तें सांगा ॥ ५४ ॥

नारद ऋषि म्हणतात- ' हे निष्पाप भक्तिरूप स्त्रिये ! तुझ्यासंबंधीं तूं जें आतां सांगितलेंस त्याचा मी अंतर्ज्ञानानें विचार केला. तूं आतां कोणत्याहि प्रकारचा खेद मानूं नको. श्रीकृष्ण तुझें कल्याण करील ! ' ॥ ५५ ॥

सूत म्हणतात :—नंतर नारद ऋषि क्षणभर विचार करून व असें होण्याचें कारण जाणून तिला पुनः बोलूं लागले ॥ ५६ ॥

नारद ऋषि म्हणतात—' हे मुली, मी जें सांगत आहें तें स्वस्थ चित्तानें ऐकून घे. हें भयंकर कलियुग सुरू झालें आहे व त्यामुळें जिकडे तिकडे सदाचाराचा नाश झाला आहे. योगमार्ग व तपश्चर्याहि लुप्तप्राय झाली आहे ॥ ५७ ॥ सर्व लोक मोठे पापी, शठ आणि राक्षसाप्रमाणें दुष्कर्मे बनले आहेत. ह्या कलियुगांत साधू लोकांना दुःख भोगावें लागत असून दुष्टांना आनंद भोगायला मिळत आहे ! जो पुरुष धैर्य धरून आनंदांत काळ घालवितो, त्यालाच धीर व पंडित म्हणतात ॥ ५८ ॥ ही पृथ्वी अस्पृश्यांना पाहून प्रतिवर्षी हलू शेषाला भारभूत होत चालली आहे. हिजवर मंगलाचें नांव सुद्धां दिसत नाहीं. ॥ ५९ ॥ पुत्रासह वर्तमान बसलेल्या तुला कोणी सुद्धां पाहत नाहीं. सर्व लोक प्रेमांध झाल्यामुळें तुझ्याकडे दुर्लक्ष करीत होते व त्यामुळें तुला जीर्णावस्था प्राप्त झाली होती ॥ ६० ॥ पण जेव्हां तूं वृंदावनांत गेलीस, तेव्हां तेथें मात्र तुला पुनः नवीन तारुण्य प्राप्त झालें. त्यामुळें तें वृन्दावन धन्य होय. या ठिकाणीं

खरोखर भक्ति नृत्य करित्ये ॥ ६१ ॥ ह्या ठिकाणीं ज्ञान व वैराग्य यांचा स्वीकार करणारें कोणी नसल्यामुळेंच यांना जराहि सोडीत नाहीं. येथे हे दोघे आत्मसुखानेंच थोडेसे झोंपी गेले आहेत. ॥ ६२ ॥

भक्ति म्हणत्ये—'नारदा ! परीक्षित् राजानें हा अशुद्ध कलि शिल्लक कां ठेविला आहे? कलि सुरू झाला त्या वेळीं सर्वश्रेष्ठ असा महात्मा परीक्षित् कोठें राहण्यास गेला होता ? ॥ ६३ ॥ ह्या माझ्या सर्व संशयांचें निरसन करा. आपल्या भाषणानें मला सुख होत आहे ' ॥६४ ॥

नारद म्हणतात—" हे मुली, ज्यापेक्षां तूं मला प्रेमानें प्रश्न केला आहेस, त्यापेक्षां जें मी तुला सांगतों तें तूं श्रवण कर. मी तुला सर्व कांहीं सांगतों. ज्यायोगें तुझ्या मनांतील खिन्नता पार नाहींशी होईल ॥ ६५ ॥ ज्या दिवशीं भगवान श्रीकृष्ण भूलोक सोडून निजधामाला गेले, त्याच दिवसापासून सर्व मोक्षप्रापक साधनांचा नाश करणारा कलि येथें प्रविष्ट झाला. ॥ ६६ ॥

परीक्षित् राजानें दिग्विजयप्रसंगीं कलि पाहिला; पण कलि त्याला दीन होऊन शरण गेला व म्हणाला कीं, हे राजा, सार भक्षण करणाऱ्या पक्षुपक्ष्यांप्रमाणें हा मी मारण्यास योग्य नाहीं ॥६८॥ कारण जें फळ तपश्चर्येनें, योगानें किंवा समाधीनेंहि मिळत नाहीं, तेंच फळ कलियुगांत भगवंताचें कीर्तन केल्यानें उत्तम रीतीनें मिळतें ॥६८॥ कलीचें भाषण ऐकून आणि सर्वत्र एकजात कलीचें प्राबल्य झालें आहे असें पाहून. कलियुगांत उत्पन्न झालेल्या प्राण्यांना सुख व्हावें म्हणून सर्व श्रेष्ठ वस्तूंना नीरसत्व देणारी अशी ही वस्तु राजानें स्थापित केली ॥६९॥ ह्या कलिप्रभावामुळें जगांतील सर्व प्रदेशांत असणारें सार निघून गेलें. ज्याप्रमाणें भाताच्या पोतांना (सालांना) अंकुर फुटत नाहींत, त्याचप्रमाणें जगांतील सर्व पदार्थ पोलांप्रमाणें निर्जीव झाले आहेत ॥७०॥ ब्राह्मणांनीं तांदुळाच्या लोभानें घरोघर प्रत्येक पुरुषाला भागवतकथा सांगण्यास सुरुवात केल्यामुळें कथेचें महत्त्व निघून गेलें आहे ॥७१॥ तसेंच भयंकर पापकर्में करणारे नास्तिक व घोर कृत्यें करणारे पुरुषहि तीर्थाचे ठिकाणीं राहात असल्यामुळें तीर्थाचें महत्त्व कमी झालें आहे आणि काम, क्रोध, लोभ व वासना ह्यांनीं व्याकुळचित्त झालेले लोक तपश्चर्या करण्यास प्रवृत्त झाल्यामुळें तपश्चर्येंत सत्त्व उरलें नाहीं ॥७२॥७३॥ मनोनिग्रह, नसल्यामुळें लोभामुळें. दंभामुळें पाखण्डाचा आश्रय केल्यामुळें व शास्त्राचें अध्ययन न केल्यामुळें ध्यानयोगाचें फळ नष्ट झालें आहे ॥७४॥

पंडित लोक रेड्याप्रमाणें पत्नीशीं रममाण होऊन केवळ पुत्रोत्पादन कार्यांतच निमग्न आहेत. मोक्षमार्गाकडे त्यांचें मुळींच लक्ष नाहीं ॥७५॥ 'सांप्रदायानुसार प्राप्त होणारा वैष्णव धर्म कोठेंहि नाहीं ' अशी बडबड करणारीं माणसें मात्र जागोजागीं शिल्लक राहिलीं आहेत ॥७६॥ ह्या सर्व गोष्टी युगधर्मानुसार होत आहेत, त्या बाबतींतहि दोष

देतां येत नाहीं व म्हणूनच्च श्रीकृष्ण नेहमीं तुमच्याजवळ वास करीत आहे" ॥७७॥

सूत म्हणतात—शौनकादि ऋषि हो ! याप्रमाणें नारदाचें भाषण ऐकून भक्तिरूपी स्त्रीला मोठेंच्च आश्चर्य वाटलें व ती पुन्हां नारद ऋषीला जें बोलली तें मी तुम्हांला सांगतों, ऐका ॥७८॥

भक्ति म्हणत्ये—हे नारदा. तूं धन्य आहेस. माझ्या सुदैवानेंच्च मला तुझें दर्शन घडलें. सत्पुरुषांचें दर्शन ह्या लोकीं सर्व सिद्धि देणारें असतें ॥७९॥

हे नारदा ! ज्या तुमच्या उपदेशामृताच्या एका भाषणाचा स्वीकार करून प्रल्हाद भगवंताच्या मायेला ह्या जगामध्यें जिंकिता झाला, तसेंच्च ज्या तुमच्या कृपाप्रसादानें ध्रुव अढळ पदाला पोंचला, त्या सर्व कौशल्याचें भांडार व ब्रह्मदेवाचे मानसपुत्र अशा तुम्हांला मी नमस्कार करीत आहें ॥ ८० ॥

**अध्याय पहिला समाप्त**

---

# अध्याय २ रा



नारद म्हणतात, हे मुली, तूं उगीच खेद करीत आहेस. चिंता कां बरें करित्येस? श्रीकृष्णचरणकमलाचें स्मरण कर म्हणजे तेणेंकरून तुझें सर्व दुःख नष्ट होईल ॥ १ ॥ ज्या श्रीकृष्णानें कौरवांकडून उत्पन्न झालेल्या संकटांपासून द्रौपदीचें रक्षण केलें व गोपींचें पालन केलें, तो श्रीकृष्ण कोठेंहि दूर गेलेला नाहीं ॥ २ ॥ त्यांतूनही तूं तर त्या श्रीकृष्णाची नेहमीं प्राणाहूनहि अधिक प्रिय असलेली अशी भक्ति आहेस. भगवंताला बोलाविलें असतां तो नीचाच्याहि घरीं गमन करितो ॥३॥ ' सत्यादि तीन युगांमध्यें ज्ञान व वैराग्य हीं मुक्तीचीं साधनें होतीं; परंतु कलियुगांत तर केवळ भक्तिच मोक्ष देणारी आहे ॥४॥ असा निश्चय करून श्रेष्ठ आनंदाची मूर्ति असा चैतन्यरूप भगवान् श्रीकृष्ण सुंदर, प्रिय व सत्य अशा तुला उत्पन्न करिता झाला ॥ ५ ॥ एके प्रसंगीं तूं हात जोडून भगवंताला " मी काय करूं?" असें विचारिलेंस. त्या वेळीं श्रीकृष्णानें " माझ्या भक्ताचें पोषण कर ! " अशी तुला आज्ञा दिली ॥६॥ व तूं तें कार्य करण्याचें कबूल केलेंस. त्यामुळें भगवान श्रीकृष्ण तुजवर प्रसन्न झाला व त्यानें मुक्ति नांवाची दासी आणि ज्ञान व वैराग्य नांवाचे हे दोन पुत्र तुला दिले. तूं स्वतःचें भक्तिस्वरूप घेऊन वैकुंठामध्यें भक्तांचें पोषण करित्येस; आणि ह्या लोकीं तूं भक्तीची पुष्टि करण्यासाठीं छायारूपानें राहिली आहेस ॥७॥८॥ मुक्ति, ज्ञान व वैराग्य ह्या तिघांना बरोबर घेऊन तूं ह्या भूलोकीं प्राप्त झाली आहेस. तूं कृतयुगापासून तों द्वापरयुगाच्या अखेरपर्यंतच्या कालावधींत मोठ्या आनंदानें राहात होतीस ॥९॥ कलियुगांत पाखंड रोगानें पीडित होऊन मुक्ति क्षीण झाली आणि ती तुझ्याच आज्ञेनें ताबडतोब वैकुंठलोकाला गेली ॥१०॥ तथापि तिचें स्मरण करतांक्षणींच ती तत्काल तुझ्याजवळ धांवत येते. ज्ञान व वैराग्य या दोघांना त पुत्राप्रमाणें मानून येथें आपणाजवळ रक्षिलें आहेस ॥११॥ कलियुगांत लोकांनीं यांची उपेक्षा केल्यामुळें हे तुझे—ज्ञान व वैराग्य—दोघेही पुत्र आळशी आणि वृद्ध झाले आहेत. असें जरी आहे, तरी पण त्याबद्दल तूं चिंता करूं नकोस. या बाबतींत काय करावें त्याचा विचार मी करितों ॥१२॥ हें वरानने ! कलियुगासारखें दुसरें कोणतेंहि श्रेष्ठ युग नाहीं. करितां ह्याच कलियुगांत मी तुझी घरोघर प्रत्येक पुरुषाचे ठिकाणीं स्थापना करीन ॥१३॥ दुसऱ्या धर्मांना दूर सारून व मोठमोठ्या उत्सवांना पुढें करून त्या निमित्तानें तुझी भरभराट करीन. असें जर न करीन तर मी खरा हरिदासच नव्हे ! ॥ १४ ॥ जे जीव तुझ्याशीं युक्त होऊन राहतील ते जरी पापी असले तरी निर्भय अशा विष्णुलोकाला जातील ॥१५॥ ज्यांच्या अंतःकरणांत नेहमीं प्रेमरूपी भक्ति राहील ते निर्मल अंतःकरणाचे होतील व त्यांना स्वप्नांत सुद्धां यमाची भीति राहणार नाहीं ॥१६॥ प्रेत, पिशाच, राक्षस अथवा देवसुद्धां भक्तियुक्त अंतःकरणाच्या मनुष्यांना म्हणजे भक्तांना स्पर्श कर-

ण्यास समर्थ होणार नाहींत ॥१७॥ जो परमेश्वर तपश्चर्येनें, वेदाध्ययनानें, ज्ञानानें व कर्मानेंहि साध्य होत नाहीं, तोच परमेश्वर केवळ भक्तीनें मात्र साध्य होतो. ह्याला प्रमाण गोपी होत ॥१८॥ मनुष्याला भक्तिविषयक प्रेम हजारों जन्मांनीं प्राप्त होतें. कलियुगांत भक्तिच श्रेष्ठ आहे. कलियुगांत भक्ति हेंच एक मोक्षाचें साधन ठरलें आहे. भक्तीच्या योगें श्रीकृष्ण भक्ताच्या समोर येऊन उभा राहतो ॥१९॥ जे भक्तीशीं वैर करितात ते त्रैलोक्यांत सर्वत्र दुःखीच होतात. भक्तीची निंदा केल्यामुळें पूर्वी दुर्वास ऋषीला अपार दुःख सोसावें लागलें ॥ २० ॥ व्रताचरण बस्स झालें. तीर्थाटनांचाहि फारसा उपयोग नाहीं. योगसाधनहि पुरें झालें. यज्ञाची खटपट करण्याचीहि कांहीं जरुरी नाहीं. मोठमोठ्या शास्त्रज्ञानाची बडबडहि पुरे झाली. हीं व्रताचरणादि सारीं साधनें भक्तीवांचून व्यर्थ होत. भक्ति मात्र खरी मुक्ति देणारी आहे ॥ २१ ॥

सूत म्हणतात, शौनकादि ऋषि हो ! याप्रमाणें नारदऋषीनें वर्णिलेलें स्वतःचें माहात्म्य ऐकून भक्ति सर्व अवयवांनीं धष्टपुष्ट झाली; व नारदऋषीला म्हणाली ॥ २२ ॥

हे नारदा ! तूं धन्य आहेस. तुझें माझ्यावर अत्यंत प्रेम आहे. मी तुला कधींहि सोडून जाणार नाहीं. मी नेहमीं तुझ्या अन्तःकरणांत राहत जाईन ॥ २३ ॥ हे सत्पुरुषा नारदा ! तूं दयाळूपणानें माझी पीडा एका क्षणांत नष्ट करून टाकिलीस; परंतु हे माझे मुलगे जागे होत नाहींत, त्यांना जागे कर ! ॥ २४ ॥

सूत म्हणतात, शौनकादि ऋषिहो ! त्या भक्तीचें हें अशा प्रकारचें भाषण ऐकून नारदाला तिची फार दया आली व तो त्या दोघांना हातानें हालवून उठविण्याचा प्रयत्न करूं लागला. ॥ २५ ॥ त्यानें आपलें मुख त्या दोघांच्या कानांशीं नेऊन त्यांना " हे ज्ञाना ! लवकर जागा हो. हे वैराग्या ! लवकर उठून बस !" असें मोठ्यांदां ओरडून म्हटलें ॥ २६ ॥ ज्ञान व वैराग्य यांना उठविण्यासाठीं त्यानें वेदघोष केला व वेदान्तशास्त्राचेंहि पठण केलें. तसेंच वारंवार गीतापाठहि केला. तेव्हां ते किंचित् जागे होऊन कसेबसे एकदाचे उठून बसले ॥ २७ ॥ उठतांच त्यांनीं एखाद्या आळश्याप्रमाणें जांभया वगैरे दिल्या नाहींत किंवा डोळे चोळीत इकडे तिकडे पाहिलेंही नाहीं. स्वस्थ बसून राहिले. त्यांचे केस बगळ्याप्रमाणें शुभ्र झाले होते व बहुतेक सर्व शरीर सुकलेल्या लांकडाप्रमाणें झालें होतें ॥ २८ ॥ त्यांना अतिशय भूक लागलेली होती व बरेच दिवस खावयास कांहीं न मिळाल्यामुळें ते कृश झाले होते. तसेंच त्यांच्या डोळ्यांवर झोंपही होती. अशा त्या दोघांना पाहून नारद विचार करूं लागला कीं, ह्या दोघांना जागें करण्यास कोणती बरें युक्ति योजावी ? काय केलें असतां हे जागे होतील ? ॥ २९ ॥ ह्यांना ही अशी पुनःपुनः झोंप कां बरें येत आहे ? हे अतिशय म्हातारेही झालेले दिसतात. असा विचार करीत त्यानें भगवंताचें स्मरण केलें ॥ ३० ॥ तत्क्षणींच अशी आकाशवाणी झाली कीं, ' हे नारद मुने ! तूं खेद करूं नकोस. तुझा उद्योग निःसंशय सफळ

होईल ॥ ३१ ॥ ह्या दोघांना जागें करण्याकरितां नारदा ! तूं सत्कर्म कर. तें सत्कर्म कोणतें त्या संबंधानें तूं साधूंना विचार, ते तुला सर्व कांहीं सांगतील. सत्पुरुषांचें सद्गुण हेंच भूषण आहे ॥ ३२ ॥ तूं सत्कर्म केलेंस म्हणजे त्या योगें ह्या दोघांची निद्रा आणि जरा नाहींशा होतील व एका क्षणांत सर्वत्र भक्तीचा प्रसार होईल' ॥ ३३ ॥ अशा प्रकारें स्पष्टपणें झालेली आकाशवाणी सर्वांनीं ऐकली. ती वाणी ऐकून नारदाला अत्यंत आश्चर्य वाटलें व आकाशवाणीनें सांगितलेलें सत्कर्म कोणतें असावें याचा तो विचार करूं लागला ॥ ३४ ॥ तो म्हणाला, ह्या आकाशवाणीनें जें कांहीं मोघम साधन सांगितलें तें साधन कोणतें असावें, कीं ज्या योगें ह्या दोघांचें कार्य होणार आहे ? ॥ ३५ ॥ आकाशवाणीनें सांगितलेले सत्पुरुष कोठें बरें भेटतील ? ते सत्कर्मरूपी साधन कसें बरें देतील ? आणि आकाशवाणीनें जें कांहीं मला सांगितलें त्याबद्दल मी काय करावें ? ॥ ३६ ॥

सूत म्हणतात, शौनकादि ऋषि हो, असा विचार करीतच नारदमुनि त्या दोघांनांहि तेथें तसेंच ठेवून निघाला. रस्त्यामध्यें व प्रत्येक तीर्थाचे ठिकाणीं तो त्याजबद्दल ऋषि इत्यादींना विचारूं लागला ॥ ३७ ॥ नारदाचें बोलणें सर्व ऐकून घेत; परंतु निश्चित असें समाधानकारक उत्तर कोणीहि देईना. कित्येक लोक म्हणत, सत्कर्म याची व्याख्याच असाध्य आहे. दुसरे कोणीं म्हणत, हें तर जाणण्यासच फार कठीण आहे ॥ ३८ ॥ कित्येकांनीं तर मौनच धरलें ! आणि कित्येकांनीं पलायनाचा मार्ग स्वीकारला ! ! तात्पर्य, कोणालाही त्याचें उत्तर देतां आलें नाहीं. सर्व ठिकाणीं हाहाःकार उडाला व सर्व त्रैलोक्यांत लोकांना आश्चर्य वाटलें ॥ ३९ ॥ 'वेदपठण व वेदांतघोष यांनीं, त्याचप्रमाणें गीतापाठांनीं जागृत करण्याचा प्रयत्न केला तरी सुद्धां जेव्हां भक्ति, ज्ञान व वैराग्य हीं तिघें उठलीं नाहींत, तेव्हां ह्याहून आतां ह्याला दुसरा कोणताहि उपाय नाहीं' असें जो तो आपापसांत एकमेकाच्या कानाशीं कुजबुजूं लागला. 'जें खरोखर नारदऋषीलाहि निश्चयपूर्वक जाणतां आलें नाहीं, तें इतर साधारण मनुष्यांना कसें बरें सांगतां येणार ? । निर्णयपूर्वक विचार करतां हे सर्वथैव जाणण्यास कठीण आहे' असें ऋषींनीं त्याला उत्तर दिलें ॥ ४० ॥ ४१ ॥ ४२ ॥ या उत्तरामुळें चिंताव्याकुळ होऊन नारद ऋषि बदरिकाश्रमाला गेला व तेथें त्यानें मनांत निश्चय केला कीं, ह्या तिघांच्या उत्थापनार्थ ह्या ठिकाणीं तप करावें. असा नारद जों विचार करीत आहे तों त्याच्या अग्रभागीं त्याला सनकादि महर्षि दृष्टीस पडले व तो त्या कोट्यवधि सूर्यांप्रमाणें तेजस्वी, कांतिमान् अशा त्या सनकादिकांना म्हणाला ॥ ४३ ॥ ४४ ॥

नारद ऋषि म्हणतात, " कुमारहो ! सांप्रत सुदैवानें आपला समागम मला घडला आहे. तरी मी जें विचारीत आहें त्याचें आपण कृपा करून मला उत्तर द्यावें ॥ ४५ ॥ आपण सर्व योगी असून बुद्धिमान् व बहुश्रुत आहां. आपलें वय जरी पांच वर्षांचेंच आहे, तरी आपण पूर्वजांचेही पूर्वज आहांत ॥ ४६ ॥ आपण नेहमीं वैकुंठांतच राहतां

व नेहमीं भगवत्कीर्तन करण्यांत तत्पर असतां. भगवंताच्या कथामृतरसाच्या सेवनानें उन्मत्त होऊन कथा हेंच ज्यांचें जीवन आहे असे आपण आहां ॥ ४७ ॥ "हरि हाच आपला रक्षक आहे" असे वाक्य नेहमीं आपल्या मुखामध्यें असतें; म्हणून कालाच्या योगें प्राप्त होणारी वृद्धावस्था आपणाला पीडा देत नाहीं ॥ ४८ ॥ आपल्या वांकड्या भुवयांनींच विष्णूचे दोन द्वारपाळ पूर्वी जमिनीवर पडले व आपल्या कृपेनेंच पुनः वैकुंठपुराला प्राप्त झाले ॥ ४९ ॥ माझ्या सुदैवानेंच आज मला येथें आपलें दर्शन घडलें. करितां आपण दयाळूपणें दीन अशा मजवर अनुग्रह करावा ॥ ५० ॥ मला आकाशवाणीनें जें मोक्षम साधन सांगितलें तें कोणतें साधन, हें आपण सांगा व त्या साधनाचें अनुष्ठान कसें करावें, हेंहि आपण मला विस्तारपूर्वक सांगा ॥५१॥ भक्ति, ज्ञान व वैराग्य यांना कशानें सुख होईल व ह्या तिघांची स्थापना सर्व वर्णांचे ठिकाणीं कोणत्या प्रयत्नानें प्रेमपूर्वक होईल हेंहि सांगा ॥ ५२ ॥

कुमार म्हणाले---हे महर्षे नारदा ! तूं काळजी करूं नकोस. पूर्वीपासूनच ठरलेला असा ह्या बाबतींत एक उपाय आहे ॥ ५३ ॥ नारदा ! तूं धन्य आहेस. तूं वैराग्ययुक्त पुरुषांमध्यें श्रेष्ठ आहेस. हरिदासांमध्यें तूं सर्वमान्य आहेस व सूर्याप्रमाणें योगश्रेष्ठ आहेस ॥ ५४ ॥ तूं भक्तीसाठीं इतका प्रयत्न करीत आहेस ह्यांत कांहीं आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. हरिदास नेहमीं भक्तीची स्थापना करण्याचाच प्रयत्न करीत असतात ॥ ५५ ॥ ह्या लोकीं ऋषींनीं परमार्थानें अनेक मार्ग सांगितले आहेत; परंतु ते सर्व श्रमानें साध्य होणारे असून बहुतेक स्वर्गफलाची प्राप्ति करून देणारे आहेत ॥ ५६ ॥ वैकुंठलोकाची प्राप्ति करून देणारा जो मार्ग आहे, तो खरोखर गुप्तच राहिला आहे. त्या मोक्षप्रापक मार्गाचा उपदेशक मोठ्या सुदैवानेंच मिळतो ॥ ५७ ॥ आकाशवाणीनें तुला जें पूर्वी सत्कर्म कर म्हणून सांगितलें तें सत्कर्म कोणतें तें मी तुला आतां सांगतों. तूं तें शांत चित्तानें व लक्षपूर्वक ऐक ॥ ५८ ॥ नारदा, द्रव्यविषयक यज्ञ, तपश्चर्याविषयक यज्ञ, योगयज्ञ, त्याचप्रमाणें दुसरे वेदाध्ययनविषयक यज्ञ, ज्ञानयज्ञ हे सर्व यज्ञ कर्मसूचक होत ॥ ५९ ॥ परंतु सत्कर्माला दर्शविणारा असा मात्र खरोखर एक ज्ञानयज्ञच होय असें ज्ञानी लोकांनीं शास्त्रांत सांगितलें आहे. तो ज्ञानयज्ञ म्हणजे श्रीमद्भागवत महापुराणाचें पठण हा होय. हें भागवतमहापुराण शुकाचार्य वगैरेंनीं गायिलें आहे ॥ ६० ॥ ह्या श्रीमद्भागवताच्या पाठघोषानें भक्ति, ज्ञान व वैराग्य ह्यांना मोठें बळ प्राप्त होईल. ह्यायोगें ज्ञान व वैराग्य या दोघांचे कष्ट दूर होतील व भक्तीला सुख होईल ॥ ६१ ॥ श्रीमद्भागवतघोषध्वनीच्या श्रवणानें, ज्याप्रमाणें सिंहाची गर्जना ऐकून लांडगे पळून जातात त्याप्रमाणें हे सर्व कलीसंबंधीचे दोष पळून जातील, म्हणजे नाश पावतील आणि ज्ञान व वैराग्य यांनीं युक्त अशी प्रेमरसपरिप्लुत भक्ति त्या भागवताच्या पाठानें घरोघर प्रत्येक मनुष्याचे ठिकाणीं क्रीडा करील ॥ ६२, ६३ ॥

नारदऋषि म्हणतात, अहो कुमार हो ! वेदघोष, वेदान्त शास्त्राचें पठण, त्याच-प्रमाणें गीतापाठ हीं केलीं असतांहि भक्ति, ज्ञान व वैराग्य हीं तिघें श्रेष्ठ ज्या अर्थीं अजूनहि जागीं झालीं नाहींत ॥ ६४ ॥ त्या अर्थीं तीं तिघे ह्या श्रीमद्भागवतपठणानें कशीं जागीं होतील ? फार तर त्या कथांमध्यें प्रत्येक श्लोकांत व प्रत्येक शब्दांत वेदार्थच भरलेला असेल ! ॥ ६५ ॥ आपलें दर्शन निष्काम होणारें नसल्यामुळें हा माझा संशय आपण दूर करावा. आपण शरण आलेल्या प्राणिमात्रावर प्रेम करणारे असल्यामुळें ह्या माझ्या संशयाचें आपण निराकरण करावें ॥ ६६ ॥

सनकादिक कुमार म्हणाले, नारदा ! ही भागवतकथा वेद व उपनिषदें ह्यांचें सार म्हणून काढिली असल्यामुळें तिचें फळ वेदोपनिषदांहून श्रेष्ठ झालें आहे. मधुर फळाप्रमाणें हें फळ निरनिराळ्या स्वरूपांत भासमान होतें ॥ ६७ ॥ हें भागवतरूपी फळ मुळापासून तों शेंड्यापर्यंत सर्वांच्या सर्वांच रसानें अगदीं भरून गेलेलें आहे. तो रस भागवतफळांत फळरूपानें आहे तोंपर्यंत त्याला निराळा स्वाद येत नाहीं. या भागवतामध्यें त्याज्य भाग किंचित् सुद्धा नाहीं. तो रस पुनःपुनः निरनिराळ्या रसस्वरूपानें प्रगट होऊन जगाला मोठा रुचि देणारा व मनोहर असा होतो ॥ ६८ ॥ ज्याप्रमाणें दुधांत असणारें तूप दुधाच्या स्वरूपांत आहे तोंपर्यंत तें तुपाची रुचि देत नाहीं, पण तेंच तूप दुधाहून वेगळें केलें म्हणजे तें तूपद्रव्य देवांच्या रसरुचीला वाढविणारें होतें, त्याप्रमाणें अथवा ऊंसहि मुळापासून शेंड्यापर्यंत साखरेनेंच भरून राहिला आहे, परंतु ती साखर उंसांतून बाहेर आली तरच ती अधिक मधुर लागते, त्याप्रमाणें ही भागवतकथा आहे ॥ ६९ ॥ ७० ॥ हें भागवत नांवाचें पुराण वेदमान्य आहे. हें भक्ति, ज्ञान व वैराग्य ह्यांची स्थापना करण्यासाठीं प्रगट झालें आहे ॥ ७१ ॥ वेदान्तशास्त्र व वेद यांत पारंगत व गीतेल निर्माण करणारे व्यास पश्चात्तापयुक्त होऊन अज्ञानसमुद्रांत बुडून मोहित झाले असतां त्यांना बोध करण्यासाठीं म्हणून तूं चार श्लोकांनीं युक्त असें हें भागवतपुराण पूर्वी व्यासान सांगितलें होतेंस. व त्याच भागवताच्या श्रवणानें व्यासमुनींचा मोहही नाहींसा झाला होता ॥ ७२, ७३ ॥ तुला असें आश्चर्य कशामुळें वाटत आहे कीं, ज्यामुळें तूं मला अशा तऱ्हेचा प्रश्न करावास ! श्रीमद्भागवताचें श्रवण, शोक व दुःख ह्यांचें निवारण करणारें आहे ॥ ७४ ॥

नारद मुनि म्हणतात, ज्याचें दर्शन पातकांचा नाश करतें व संसारांतील दुःखांच्या वणव्यानें पीडिलेल्यांचें कल्याण करितें, प्रेमाला प्रकट करणारी ज्याची कृति आहे, अशा त्या भागवतरूपी परमेश्वराला, शेषाच्या मुखांतून गायिलें जाणारें भागवतकथारूपी अमृत

संपूर्णच्या संपूर्ण प्राशन करणारा मी शरण गेलों आहें ॥ ७५ ॥ ज्या वेळीं पुरुष खरोखर मोठ्या भाग्यानें अनेक जन्मांतीं प्राप्त झालेल्या साधूंच्या समागमाच्या योगें, अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या मोहजन्य मदरूपी अंधकाराचा नाश करितो, त्याच वेळीं त्याचे ठिकाणीं खरोखर विचारशक्तीचा उदय होतो ॥ ७६ ॥

**अध्याय दुसरा समाप्त**

---

# अध्याय ३ रा



नारद ऋषि म्हणतात, शुकाचार्यांनीं उपदेशिलेल्या भागवतकथेनें प्रज्वलित झालेल्या ज्ञानयज्ञाचें भक्ति, ज्ञान व वैराग्य यांच्या स्थापनेसाठीं मी मोठ्या प्रयत्नानें अनुष्ठान करणार आहें ॥१॥ मी हा ज्ञानयज्ञ येथें कोठें करावा तें स्थान मला दाखवून द्या ! शुकोपदिष्ट भागवतमाहात्म्य वेदवेत्त्या ज्ञानी पुरुषांनींच वर्णन करण्याजोगें आहे ॥ २ ॥ ही भागवतकथा किती दिवसांत श्रवण करावी, त्या भागवतश्रवणाचे बाबतींत कोणता विधि शास्त्रांत वर्णिला आहे, तें सर्व मला आतां सांगा ॥ ३ ॥

सनत्कुमारादि ऋषि म्हणतात, ' हे नारदा ! नम्र व विचारशील अशा तुला तें सर्व सांगतों, ऐक. गंगाद्वाराच्या जवळ आनंद नांवानें एक गंगातीर आहे ॥ ४ ॥ तेथें अनेक ऋषि बसलेले असतात. देव व सिद्ध हेहि तेथेंच राहतात. तें तीर अनेक वृक्ष व वेली यांनीं वेष्टिलेलें आहे. त्याच्या समोंवार मृदु वाळू पसरलेली आहे ॥ ५ ॥

हें स्थान अत्यंत रमणीय असून एकान्त असें आहे. तेथें कसलाही उपद्रव नाहीं. तेथें राहणारे प्राणी एकमेकांमध्यें बिलकूल वैर करीत नाहींत ॥ ६ ॥ अशा पुण्यभूमीचे ठिकाणीं तू ज्ञानयज्ञाला सुरवात करावीस, म्हणजे अपूर्व रसानें युक्त असा भागवतरूपी ज्ञानयज्ञ त्या ठिकाणीं उत्तम रीतीनें पार पडेल ॥ ७ ॥ तो भगवत्कथारूप ज्ञानयज्ञ चालू झाला म्हणजे जीर्ण होऊन राहिलेल्या व वृद्धावस्थेमुळें जर्जर झालेल्या दुर्बळ अशा ज्ञान व वैराग्य ह्या दोघांना पुढें करून भक्ति तेथें प्राप्त होईल ॥ ८ ॥ ज्या ठिकाणीं भागवत महापुराणांतील कथा चालतात त्या ठिकाणीं भक्त्यादिक प्राप्त होतात. ह्या कथांचा ध्वनि ऐकतांक्षणींच भक्ति, ज्ञान व वैराग्य ह्या तिघांना एकदम तारुण्य प्राप्त होतें. ' ॥ ९ ॥

सूत म्हणतात, शौनक मुने ! अशा रीतीनें नारदाला सांगून सनत्कुमारादि मुनि नारदमुनीसह तेथून निघून भागवतकथामृताचें प्राशन करण्यासाठीं घाईघाईनें गंगातटाकीं प्राप्त झाले ॥ १० ॥ ज्या वेळीं ते मुनि गंगातटाकीं प्राप्त झाले त्या वेळी भूलोकीं, देवलोकीं आणि ब्रह्मलोकीं मोठी धांदल उडाली ॥ ११ ॥

श्रीमद्भागवतकथामृताचें प्राशन करण्यासाठीं भक्तिरसाला लोलुप झालेले जे वैष्णव होते ते सर्वहि वैष्णव प्रथम धांवत धांवत त्या ठिकाणीं आले ॥ १२ ॥ भृगु, वसिष्ठ, च्यवन, गौतम, मेधातिथि, देवल, देवरात; परशुराम, विश्वामित्र, शाकल, मार्कण्डेय, दत्तात्रेय व पिप्पलाद मुनि ॥ १३ ॥ योगिश्रेष्ठ व्यास व पराशर, तसाच छायारूपी शुकाचार्य, जाजलि व जन्हुप्रमुख दुसरे सर्व ऋषिसंघ पुत्र व शिष्य ह्यांसह आणि आपा पल्या स्त्रियांसह अत्यंत नम्रपणें त्या ठिकाणीं आले ॥१४॥ वेदान्तशास्त्रें, वेद, मंत्रशास्त्रें

विधिनियमशास्त्रें, तसेंच महापुराणें व सहा शास्त्रेंहि शरीरें धारण करून तेथें आलीं ॥ १५ ॥ गंगादि नद्या, पुष्करादि सरोवरें, क्षेत्रें, सर्व दिग्देवता, दण्डकादि पुण्यारण्येंहि तेथें मूर्तिमंत आलीं ॥ १६ ॥ वासुकिप्रमुख नाग, देव, गंधर्व, दैत्य हेही तेथें आले. मोठेपणाच्या अभिमानामुळें जे तेथें आले नव्हते त्यांची भृगूनें समजूत घातली व त्यांना आणिलें ॥ १७ ॥ नारद ऋषीनें सनत्कुमारादि ऋषींना वंदन करून बसण्यासाठीं श्रेष्ठ आसन दिलें असतां नारदानें यज्ञदीक्षा दिलेले ते सनत्कुमारादि मुनि भगवद्भक्तिपुरःसर आपापल्या आसनांवर बसले ॥ १८ ॥ विष्णुभक्ति करणारे वैष्णव, वैराग्यशील विरक्त पुरुष, संन्यासी व ब्रह्मचारी ह्यांना सर्वांच्या पुढें बसवून नारदऋषि आपण स्वतः त्यांच्याहि पुढें जाऊन बसला ॥ १९ ॥ एका बाजूला ऋषींचा संघ बसला व दुसऱ्या बाजूला देवसमुदाय बसला. तिसऱ्या एका बाजूला वेद व उपनिषदें बसलीं व चौथ्या बाजूला तीर्थें व स्त्रिया बसल्या ॥ २० ॥ नंतर सर्वत्र जयजय असा व नमः नमः असा शब्द होऊन शंखनादानें सर्व स्थान दुमदुमून गेलें आणि सर्वत्र लाह्यांच्या चूर्णाचा व फुलांचा वर्षाव सुरू झाला ॥ २१ ॥ देवांचे अधिपति विमानांत बसून कल्पवृक्षांचीं फुलें सर्वत्र फेकूं लागले ॥ २२ ॥

सूत म्हणतात, शौनक मुने ! ह्याप्रमाणें ते सर्व स्वस्थान्तःकरणानें बसले असत सनत्कुमारादि मुनींनीं महात्म्या नारदाला स्पष्ट रीतीनें श्रीमद्भागवतमाहात्म्य सांगावयाला आरंभ केला ॥ २३ ॥

सनत्कुमारादि मुनि म्हणतात, हे नारदा ! आतां आम्ही तुम्हांला शुकाचार्यांनें उपदेशिलेलें श्रीमद्भागवतमाहात्म्य सांगणार आहों. ज्या माहात्म्याच्या श्रवणानें मुक्ति तात्काळ हस्तगत झाल्यासारखी होते ॥ २४ ॥ श्रीमद्भागवतकथेचें श्रवणकथनादि करून वारंवार सेवन केलें असतां त्यायोगें श्रीविष्णु भक्ताच्या अंतःकरणांत वास करून राहतो ॥ २५ ॥ ह्या श्रीमद्भागवतग्रंथाची श्लोकसंख्या १८ हजार असून त्याचे एकंदर बारा स्कंध आहेत व यामध्यें परीक्षित् राजा व शुकाचार्य ह्यांचा संवाद दिलेला आहे. असें हें श्रीमद्भागवत आम्ही सांगतों तें ऐका ॥ २६ ॥ जोंपर्यंत शुकाचार्यांनें सांगितलेली श्रीमद्भागवतकथा मनुष्य क्षणभरहि कर्णद्वारा श्रवण करीत नाहीं, तोंपर्यंत त्याला अज्ञानामुळें ह्या संसारचक्रांत भ्रमण करावें लागतें ॥ २७ ॥ पुष्कळ शास्त्रांच्या श्रवणानें काय उपयोग होणार आहे ? तसेंच भ्रमोत्पादक अनेक पुराणेंही श्रवण केल्यानें काय लाभ व्हावयाचा आहे ?त्यांच्यापासून मुक्ति मिळावयाची नाहीं. भागवतमहापुराणरूपी शास्त्र मात्र खात्रीनें मुक्ति देणारें म्हणून गर्जत आहे ॥ २८ ॥ ज्यांच्या घरीं भागवतकथा नेहमीं चालू आहे, त्यांचें घर तीर्थाप्रमाणें पुण्यकारक होय. त्यांच्या घरीं जे कोणी राहतील त्यांचें पाप समूळ नाश पावतें ॥ २९ ॥ हजार अश्वमेध यज्ञ व शंभर वाजपेय यज्ञ हे भागवतकथेच्या सोळाव्या हिस्सालाहि योग्य ठरत नाहींत. ॥ ३० ॥

ऋषि हो, जोंपर्यंत मनुष्यें भागवतकथांचें उत्तम रीतीनें श्रवण करणार नाहींत, तोंपर्यंत त्यांच्या देहामध्यें पातकांचा निवास होणार ॥ ३१ ॥ गंगा, गया, काशी, पुष्कर व प्रयाग हीं पुण्यक्षेत्रें फलाच्या दृष्टीनें श्रीमद्भागवताची बरोबरी करूं शकत नाहींत. ॥ ३२ ॥ नारदा, जर तुला श्रेष्ठ गति जी मुक्ति ती मिळावी अशी इच्छा असेल तर आपल्या मुखानें श्रीमद्भागवतांतील निदान अर्धा श्लोक किंवा पाव श्लोक तरी नेहमीं पठण करीत जा ॥ ३३ ॥ वेदाच्या पूर्वी उच्चारिला जाणारा " ॐ " हा प्रणव, वेदाची माता " तत्सवितुर्वरेण्यं " हा गायत्री मंत्र, व " सहस्रशीर्षा " हें पुरुषसूक्त हीं तीन मिळून हा भागवत ग्रंथ आणि " ॐ नमो भगवते वासुदेवाय " हा द्वादशाक्षरी मंत्र निर्माण झाला अहे. अर्थात् ह्यांची योग्यता सर्वश्रेष्ठ होय ॥ ३४ ॥ बारा स्वरूपांनीं राहणारा प्रयाग, वर्षरूपांनीं राहणारा काळ, ब्राह्मण, अग्निहोत्र व त्याप्रमाणें गोवत्सद्वादशी ॥ ३५ ॥ तुळस व वसन्त हे सर्व पुरुषोत्तमच होत. ज्ञानी लोक ह्यांमध्यें नाखिलातल्या भेदभाव कल्पित नाहींत ॥ ३६ ॥ जो कोणी अहोरात्र ह्या भागवतशास्त्राचें अर्थपूर्वक पठण करील, त्याची कोट्यवधि जन्मांतील पातकें नाश पावतील ह्यांत संशय नाहीं ॥ ३७ ॥ जो कोणी नेहमी निदान अर्धा श्लोक किंवा पाव श्लोक तरी ह्या भागवतांतील पठण करील त्याला राजसूय व अश्वमेध हे यज्ञ केल्याचें पुण्य प्राप्त होईल ॥ ३८ ॥ भगवच्चिंतन, तुळशीचें संरक्षण व गाईची सेवा ह्या तीन कृत्यांचें पुण्य व प्रत्यहीं भागवतपठण केल्याचें पुण्य दोन्ही सारखींच आहेत ॥ ३९ ॥ ज्यानें मृत्युकाळीं ह्या भागवताचें श्रवण केलें त्याला भगवान् श्रीकृष्ण वैकुण्ठ लोकीं नेतो. ॥ ४० ॥ जो मनुष्य सुवर्णाचा सिंह तयार करून त्या सिंहासह हा भागवत-ग्रंथ वैष्णवाला दान देतो, तो खरोखर श्रीकृष्णाशीं सायुज्य मुक्तीला प्राप्त होतो ॥ ४१ ॥ जन्मापासूनहि ज्या पापी पुरुषानें थोडेंहि भगवत्चिंतन केलें नाहीं, श्रीमद्भागवतकथेचें सेवन केलें नाहीं, त्यानें स्वतःचा सर्व जन्म चांडाळाप्रमाणें व गाढवाप्रमाणें व्यर्थ फुकट घालविला. तो मातेला प्रसूतीचें व्यर्थ दुःख देण्यास मात्र कारणीभूत झाला असें समजावें ॥ ४२ ॥ ज्यानें भागवतकथेंतील थोड्याशाहीगोष्टी श्रवण केल्या नाहींत, तो पापी पुरुष जिवंत असूनहि केवळ भात्याप्रमाणेंच श्वासोच्छ्वास मात्र धरणारा आहे असें समजावें. भगवत्-चिंतन न करणाऱ्या, पृथ्वीला भारभूत अशा त्या पशुतुल्य पुरुषाचा ब्रह्मादि देव नेहमीं धिक्कार करीत असतात ॥ ४३ ॥ ह्या लोकीं श्रीमद्भागवतांतून उत्पन्न झालेली कथा अत्यंत दुर्लभच आहे. ही कथा कोट्यवधि जन्मांमध्यें आचरिलेल्या पुण्याच्या योगानेंच प्राप्त होते ॥ ४४ ॥ म्हणून हे बुद्धिमान् नारदा ! मनुष्यानें प्रयत्नपूर्वक ह्या कथेचें नेहमीं श्रवण करावें. ही कथा अमुकच दिवशीं श्रवण करावी असा कांहीं कोणताही नियम नाहीं. ह्या कथेचें श्रवण सदोदित करावें, असें सांगितलें आहे ॥ ४५ ॥ सत्य धर्मानें वागून व ब्रह्मचर्याचें पालन करून नेहमीं भागवत श्रवण करावें. कलियुगांत अन्य मार्गानें ज्ञानप्राप्ति अशक्य असल्यामुळें ज्ञानोपदेशाचा विशेष प्रकार भागवतांत शुकाचार्यांनीं सांगितला आहे.

॥ ४६ ॥ ही भागवतकथा सात दिवसांत पुरी करावी. त्याला 'सप्ताह–पारायण' म्हणतात. ह्या सप्ताहप्रसंगीं मनाच्या वैषयिक वृत्ति जिंकिलेल्या असाव्या; मौनादि नियम व वर्णाश्रमादि सदाचार पाळावेत; व शक्य असल्यास यज्ञाप्रमाणें सप्ताहपारायणाबद्दल दीक्षा ग्रहण करावी ॥ ४७ ॥ शुकाचार्यांकडून घडलेल्या सप्ताहश्रवणाच्या योगें जें फळ परीक्षिति राजाला मिळालें, तेंच फळ माघ महिन्यामध्यें नेहमीं भागवत सप्ताहपारायणाचें श्रद्धेनें श्रवण केलें असतां प्राप्त होतें ॥ ४८ ॥ मन जिंकणें कठिण असल्यामुळें, रोगामुळें आयुष्य कमी असल्यामुळें, कलीच्या अंगीं पुष्कळ दोष असल्यामुळें भागवताचें सात दिवसांतच पारायण करावें असें सांगितलें आहे ॥ ४९ ॥ जें फळ तपश्चर्येनें प्राप्त होत नाहीं, जें फळ योगानें किंवा समाधीनेंहि प्राप्त होत नाहीं, तें सर्व फळ भागवतसप्ताह श्रवण केलें असतां अनायासानें प्राप्त होतें ॥ ५० ॥ सर्व यज्ञांहून व सर्व व्रतांहून व सर्व प्रकारच्या तपश्चर्येहूनही या भागवतसप्ताहाची महती विशेष आहे, अशी घोषणा सर्वत्र चालते. तीर्थामध्येंहि सप्ताहाची गर्जना नेहमीं चालते ॥ ५१ ॥ योगाहून, ध्यानाहून, ज्ञानाहूनहि सप्ताहाची गर्जना विशेष रीतीनें होत्ये. त्या सप्ताहाची गर्जना आम्ही किती वर्णन करून सांगावी ! 'अरे, भागवतसप्ताह हा श्रेष्ठ आहे ! अरे, सप्ताह हा श्रेष्ठ आहे !' अशी सर्वत्र गर्जना चालत असते ॥ ५२ ॥

शौनक ऋषि म्हणतात–हे सूता ! सांप्रत ज्ञानादिक धर्मांचा विचार करून हें आश्चर्यजनक कथानक तुम्ही सांगितलें आहे. योगवेत्त्यांत श्रेष्ठ अशांना सुचणारे लोककल्याणकारी हें भागवतपुराण कसें उत्पन्न झालें तें सांगा ॥ ५३ ॥

सूत म्हणतातः—हे शौनका, जेव्हां श्रीकृष्ण भूलोकाला सोडून निजधामाला जाण्यास उद्युक्त झाला, तेव्हां अकराव्या स्कंधाचें श्रवण करूनहि उद्धव श्रीकृष्णाला म्हणूं लागला ॥ ५४ ॥

उद्धव म्हणतो, ' हे श्रीकृष्णा ! भक्तांचें कार्य करून तूं तर जायला तयार झालास. तेव्हां माझ्या अंतःकरणाला एक काळजी उत्पन्न झाली आहे, ती तू दूर कर व माझ्या अंतःकरणाला सुखी कर ॥ ५५ ॥ सांप्रत हा भयंकर कलि प्राप्त झाला आहे; ह्या कलियुगांत दुष्ट लोक उत्पन्न होतील. व त्या दुष्टांच्या संगतीनें सत्पुरुषहि दुष्टपणाला प्राप्त होतील आणि मग अशा दुष्टांच्या भारानें त्रस्त झालेली पृथ्वी गाईचें रूप घेऊन कोणाचा बरें आश्रय करील ? हे कमळनेत्रा श्रीकृष्णा, तुझ्याशिवाय दुसरा कोणीहि तिचें रक्षण करणारा दिसत नाहीं ॥ ५७ ॥ हे भक्तांवर प्रेम करणाऱ्या श्रीकृष्णा ! म्हणून तूं सत्पुरुषांवर दया करून येथून जाऊं नकोस. तूं स्वत; निर्गुण निराकार असूनहि भक्तांसाठीं सगुण व साकार आणि चित्स्वरूपी झाला आहेस ॥ ५८ ॥ तुझा वियोग झाला असतां तुझे भक्त पृथ्वीवर आपला काळ कसा कंठतील ? तुझ्या निर्गुण स्वरूपाची उपासना करणें फार कठीण आहे. याकरितां ह्या बाबतींत कांहीं विचार करा आणि एखादा तरणोपायाचा मार्ग

सांगा॥ ५९ ॥ उद्धवाचें हें भाषण ऐकून श्रीकृष्ण मनांत म्हणाला, उद्धवाचें म्हणणें खरें आहे. मी निजधामीं गेल्यानंतर भक्तांना जेणेंकरून अवलंब करतां येईल असें मी कांहीं करून ठेविलें पाहिजे खरें. असा विचार करून श्रीकृष्णानें आपलें तेज भागवत महापुराणामध्यें ठेवलें, व स्वतः श्रीमद्भागवतरूपी समुद्रांत प्रविष्ट झाला । ६०, ६१ ॥ सारांश, भागवत ग्रंथ हाच श्रीकृष्णाचें वाणीरूप प्रत्यक्ष स्वरूप होय. ह्या भागवताच्या सेवनानें, श्रवणानें, पठणानें व दर्शनानें पापांचा नाश होतो ॥ ६२ ॥ त्यांमुळें भागवतसप्ताहपारायण हें सर्वांहून श्रेष्ठ मानिलें आहे. कलियुगांत सर्व साधनें बाजूला सारून भागवतश्रवण हाच धर्म सांगितलेला आहे ॥६३॥ दुःख, दारिद्र्य, दुर्भगत्व व पातकें यांचा नाश करण्यासाठीं; तसेंच काम व क्रोध यांना जिंकण्यासाठीं कलियुगांत भागवतपठण हाच सर्वोत्कृष्ट मुख्य धर्म सांगितला आहे ॥६४॥ देवांनाहि टाळण्यास अत्यंत कठीण अशी विष्णूची माया टाकून देणें पुरुषांना दुसऱ्या कोणत्याहि उपायानें शक्य नाहीं. असा विचार करून ह्या भागवतसप्ताहाचें वर्णन केलें आहे ॥६५॥ सूत म्हणतो हे शौनका ! याप्रमाणें ऋषींनीं सभेंत " भागवतसप्ताहपारायण हाच श्रेष्ठ धर्म होय " असें सिद्ध करून दाखविलें असतां त्या वेळीं तेथें एक आश्चर्यकारक गोष्ट घडली, ती मी सांगतों; तूं श्रवण कर ॥६६॥ भक्ति त्या तरुण झालेल्या दोघां मुलांना बरोबर घेऊन प्रेमरूपानें एकाएकीं तेथें प्रकट झाली व श्रीकृष्णा, हे गोविंदा, हे मुरारे, हे नाथा, हे हरे अशीं नांवें वारंवार मुखानें उच्चारूं लागली ॥६७॥ त्या वेळीं त्या सभेंतील सभासद भागवतार्थाला भूषविणाऱ्या व सुंदर वेष घेतलेल्या आणि सभेंत प्रविष्ट झालेल्या त्या भक्तीला पाहून " ही येथें ऋषींच्या सभेंत कशी आली ?" असा तर्कमूलक विचार करूं लागले ॥६८॥ त्या वेळीं सनत्कुमारादि मुनि ह्मणाले, 'ही भक्ति कथेच्या अर्थश्रवणापासून सांप्रत निष्पन्न झाली आहे.' सनत्कुमारादि मुनींचें हें भाषण ऐकून ज्ञानवैराग्य नामक पुत्रासह ती भक्ति नम्र होत्साती सनत्कुमारादि मुनींना म्हणाली ॥६९॥

भक्ति म्हणत्ये:- 'मुनि हो ! कलीच्या योगें नष्ट झालेल्याहि मला भगवत्कथामृतरसानें तुम्हीं आज पुष्ट केलें आहे. आतां मी राहावें कोठें हें आपण मला सांगा.' असें भक्तीचें भाषण ऐकतांच ते ब्रह्मपुत्र सनत्कुमारादि मुनि तिला म्हणाले ॥७०॥ "'भक्तांचे ठिकाणीं भगवंतासारखें स्वरूप निर्माण करणारी, प्रेमरूपी रसाला धारण करणारी, संसाररोगाला नष्ट करणारी, चांगल्या धैर्याचा अवलंब करून तूं नेहमीं विष्णुभक्तांच्या अंतःकरणांत रहा ! ॥७१॥ अशा रीतीनें तूं भक्ताचे ठिकाणीं राहिलीस म्हणजे कलिसंबंधीं दोष दुसऱ्यावर ताबा ठेवण्यांस समर्थ असले तरी ह्या लोकीं तुला पाहण्यासहि समर्थ होणार नाहींत." याप्रमाणें सनत्कुमारादि मुनींनीं तिला सांगितलें असतां ती भक्ति तत्क्षणीं भगवद्भक्तांच्या अंतःकरणांत जाऊन स्वस्थपणें राहती झाली ॥७२॥ ज्यांच्या हृदयामध्यें ही भगद्विषयक भक्ति वास करिते ते पुरुष जरी सर्व जगामध्यें दरिद्री असले तरी धन्य होत. कारण भगवानहि स्वतः वैकुंठलोकाचा त्याग करून सर्व प्रकारें भक्तिरूपी सूत्रामध्यें

कळसूत्री बाहुलीप्रमाणें बद्ध होऊन त्या भक्तांच्या हृदयांत प्रवेश करितो ॥७३॥ याप्रमाणें ह्या पृथ्वीतलावर आज ब्रह्मरूपी भागवत नामक ग्रंथाचें माहात्म्य किती थोर आहे म्हणून आम्ही तुम्हाजवळ वर्णावें ! कारण, भगवंताचा आश्रय केल्यामुळें हें भागवत श्रेष्ठोत्तम झालें आहे. ह्या भागवताचें पठण व श्रवण करणाराहि श्रीकृष्णासारखा होतो. अर्थात् दुसरे धर्म त्यापुढें तुच्छ आहेत ॥ ७४ ॥

## तिसरा अध्याय समाप्त

---

# अध्याय ४ था



सूत म्हणतात, शौनक मुनि हो, नंतर भक्तांवर प्रेम करणारा भगवान् श्रीकृष्ण, ‘ वैष्णवांच्या अंतःकरणांत विशिष्ट भक्ति राहिली आहे ’ असें पाहून वैकुंठलोकाचा त्याग करिता झाला ॥ १ ॥ वनमाळा धारण करणारा, मेघाप्रमाणें नीलवर्ण, पिंवळें वस्त्र नेसलेला, सुंदर कांतिमान्, कंबरपट्टा व रत्नांचे अलंकार ह्यांनीं सुंदर शोभत आहेत मकराकार कुंडलें ज्याचीं असा ॥ २ ॥ ज्याचें उदर त्रिवळीनें शोभत आहे, ज्याचा कंठ सुंदर कौस्तुभ ण्यानें प्रकाशत आहे, ज्याचें सौंदर्य कोट्यवधि मदनांना लाजवीत आहे, ज्यानें सुगंधी चंदनाची उटी लाविली आहे असा ॥ ३ ॥ श्रेष्ठ आनंदाची प्रत्यक्ष मूर्तिच असून मधुर भाषण करणारा व मुरली धारण करणारा श्रीकृष्ण, आपल्या भक्तांच्या निष्पाप हृदयांमध्यें वास करिता झाला ॥ ४ ॥ वैकुंठांत राहणारे वैष्णव आणि उद्धवादि भूलोकीं राहणारे वैष्णव असे सर्व गुप्त रूपानें भागवतकथेचें श्रवण करण्यासाठीं तेथें प्राप्त झाले ॥ ५ ॥ त्या वेळीं मोठा जयजयकार झाला व भागवतकथामृतरसाची असामान्य पुष्टि होऊन फुलांच्या पाकळ्यांची वृष्टि झाली व जिकडे तिकडे शंखनाद सुरू झाला ॥ ६ ॥ त्या सभेंत बसलेल्या लोकांना आपल्या शरीराचा, घराचा आणि स्वतःचाहि विसर पडला. त्यांची अशी तद्रूप झालेली अवस्था पाहून नारद बोलूं लागले ॥ ७ ॥

श्रेष्ठ सनत्कुमारादि, मुनि हो ! आज भागवतसप्ताहाविषयींचें हें अलौकिक माहात्म्य माझ्या दृष्टीस पडलें. मूर्ख, लबाड व पशुपक्षी सुद्धां सर्व ह्या ठिकाणीं निष्पापपणाला प्राप्त होतात ॥ ८ ॥ म्हणून ह्या मनुष्यलोकीं कलियुगांत खरोखर थोडीहि अन्तःकरणशुद्धि करणारें ह्या भागवतकथेसारखें दुसरें कोणतेंहि पवित्र साधन नाहीं. हें भागवतरूप साधन ह्या भूलोकीं सर्व पापांचें क्षालन करणारें आहे ॥ ९ ॥ करितां हे मुनि हो, भागवतकथारूपी सप्ताहयज्ञानें कोणकोणते पुरुष शुद्ध होतात तें कृपा करून सांगा. दयाळू अशा तुम्हीं लोककल्याणाचा विचार करून अनिर्वचनीय असा जो भागवतधर्माचा नवीन मार्ग प्रगट केला आहे आहे तो आम्हांला दाखवा ॥ १० ॥

सनत्कुमारादि मुनि म्हणतात—हे नारदा, जे नेहमीं पाप करणारे, दुराचरण करण्यांत तत्पर व वाईट मार्गानेंच जाणारे आहेत, तसेंच जे क्रोधाग्नीनें जळून गेलेले, कपटी, कामानें पीडिलेले असे सर्व ह्या कलियुगांत ह्या भागवतसप्ताहयज्ञानें पवित्र होतात ॥ ११ ॥ सत्याला सोडून वागणारे, आईबापांना दोष देणारे, वासनेच्या योगें पीडिलेले, आश्रमधर्माप्रमाणें न वागणारे, तसेंच पाखण्डी, हेवा करणारे, हिंसा करणारे असे सर्व ह्या कलियुगांत भागवतसप्ताहयज्ञानें पवित्रपणाला प्राप्त होतात ॥ १२ ॥ पांच प्रकारचे भयंकर ताप देऊन छळ करणारे कपटी क्रूर पिशाचाप्रमाणें निर्दय आणि तसेंच ब्राह्मणाचें द्रव्य

लुबाडून त्यावर निर्वाह करणारे व्यभिचार करणारे, इत्यादि सर्व प्रकारचे पापी प्राणी ह्या कलियुगांत भागवतसप्ताहयज्ञानें पावित्र्य संपादितात ।। १३ ।। जे लबाड लोक जबरदस्तीनें शरीरसामर्थ्यानें, मनानें व वाणीनें नेहमीं पाप करितात ते, तसेंच दुसऱ्याच्या द्रव्यावर पोषण करणारे, पापाचरणानें मळकटलेले असे हे सर्व लोक ह्या सप्ताह—यज्ञानें कलियुगांत पवित्र होतात ।। १४ ।। असो. आतां ज्या गोष्टीच्या श्रवणानें सर्व पापांचा नाश होतो अशी पूर्वी घडून आलेली एक गोष्ट मी तुम्हाला सांगतों ।। १५ ।। पूर्वी तुंगभद्रा नदीच्या कांठ एक मोठें नगर होतें. त्या नगरांत चारहि वर्ण आपआपल्या धर्मानें वागणारे असून खऱ्या सदाचाराला धरून वागण्यांत तत्पर असत ।। १६ ।। त्या नगरामध्यें सर्व वेदांत पारंगत, श्रौतस्मार्त कर्मामध्यें निष्णात व दुसरा सूर्यच कीं काय असा तेजस्वी आत्मदेव नांवाचा एक ब्राह्मण राहत होता ।। १७ ।। तो भिक्षावृत्तीनें वागत असे. त्याजवळ द्रव्यहि पुष्कळ होतें ! त्या आत्मदेवाची धुंधुली नांवाची स्त्री होती; तिजवर तो फार प्रेम करीत असे. ती ती धुंधुली सत्कुलांत जन्मलेली असून स्वरूपानेंही सुंदर होती; परंतु नेहमीं स्वतःच्याच मनानें वागत असे ।। १८ ।। तिचा स्वभाव तापट असे. लोकांच्या घरच्या उठाठेवी करणें, कारणावांचूनहि बडबड करणें असा तिचा स्वभाव होता. ती घरकार्यांत नेहमीं दक्ष राही, परंतु तिचा स्वभाव मात्र भांडखोर व कृपण असे ।। १९ ।। याप्रमाणें तीं दोघें पतिपत्नी प्रेमानें रममाण होऊन राहात असत; पण संतान नसल्यामुळें तीं नेहमीं दुःखी-कष्टी असत ।। २० ।। शेवटीं त्या दोघांनीं संततीसाठीं धर्माचरण करण्यास प्रारंभ केला. नेहमीं तीं दोघें दीन जनांना गोदान, भूमिदान, द्रव्यदान व वस्त्रदान ह्याप्रमाणें अनेक दानें देऊं लागलीं ।। २१ ।। त्यांनीं आपली अर्धी संपत्ति याप्रमाणें दानधर्म करण्यांत खर्चिली, तथापि त्यांना मुलगा किंवा मुलगी कांहींच संतान झालें नाहीं.त्यामुळें तो आत्मदेव संततीसाठीं काळजीनें व्याकुळ झाला ।। २२ ।। संततीनिमित्त दुःखीकष्टी झालेला तो ब्राह्मण एके दिवशीं घरांतून बाहेर पडला आणि अरण्यांत गेला. तेथें दुपारच्या वेळीं तृषार्त होऊन तो एका तलावाजवळ गेला आणि तेथील उदक प्राशन करून उद्विग्न अंतःकरणानें तेथेंच बसला. अशा प्रकारें चिंतामग्न स्थितींत दोन घटका तो बसला असतां तेथें एक संन्यासी आला व तोहि त्या सरोवरांतील उदक प्राशन करून विश्रांतीस्तव तेथें बसला. त्यास पाहतांच तो आत्मदेव ब्राह्मण त्या यतीजवळ गेला आणि त्यास नमस्कार करून सखिन्न अंतःकरणानें त्याच्यापुढें बसला ।। २३, २४, २५ ।।

दुःखाचे सुस्कारे सोडीत बसलेल्या त्या ब्राह्मणाकडे पाहून यति म्हणाला, हे ब्राह्मणा, तूं असा दुःखी-कष्टी कां ? तुला कसली चिंता आहे ती सांग ।। २६ ।।

ब्राह्मण म्हणाला, हे मुने, पूर्वजन्मार्जित पापांच्या संचयामुळें उत्पन्न झालेलें माझें दुःख मी आपणांस काय सांगूं ? पोटीं संतति नसल्यामुळें, देवब्राह्मणही मी प्रेमानें दिलेल्या दानाचा स्वीकार करीत नाहींत. त्यामुळें माझ्या दानाचें पुण्य पूर्वजांस मिळत नाहीं;

आपल्या नेत्रांतून टपटप गळणाऱ्या उष्णोदकाचेंच त्यांस सेवन करावें लागतें. अशा प्रकारें जीवास कंटाळलेला मी प्राणत्याग करावा अशा उद्देशानें येथें प्राप्त झलों आहें ॥ २७, २८ ॥ ब्राह्मण पुढें म्हणाला, यतिमहाराज, ज्याच्या घरीं संतति नाहीं त्या घराला धिक्कार असो. संतानरहित मनुष्याचें जीवन व्यर्थ होय. संततिहीन कुळ धिक्कारास प्राप्त होतें ॥ २९ ॥ यतिमहाराज, माझ्या घरीं मी एक गाय पाळली ती गायसुद्धां संततिरहित आहे! मी एक वृक्ष लाविला आहे, तोहि फलपुष्परहित वंध्यपणाला प्राप्त झाला आहे!! ॥ ३० ॥ फार काय सांगूं, पण जर एखादें फळ मीं आपल्या घरीं आणिलें तर तें फळहि तत्काळ नासून निरुपयोगी होतें!!! सारांश, याप्रकारें मी एक दुर्दैवानें पीडिलेला संतानहीन प्राणी आहें ॥ ३१ ॥ असें बोलून तो ब्राह्मण रुदन करूं लागला. ब्राह्मणाची ती केवलवाणी स्थिति पाहून त्या यतीचें अंतःकरण दयेनें कळवळूं लागलें ॥ ३२ ॥ यतीनें त्या ब्राह्मणाच्या कपाळावरील विधिलिखित दैवाक्षरें वाचलीं आणि तो ब्राह्मणाशीं बोलूं लागला ॥ ३३ ॥

यति म्हणाला—हे ब्राह्मणा, तूं संततिप्राप्तीचे सर्व विचार सोडून दे व विवेकमार्गाचा स्वीकार कर. कारण कर्मगति बलवत्तर आहे. ती टाळतां येणें शक्य नाहीं. तुझ्या प्रारब्धरेषेप्रमाणें तुला सात जन्म पुत्र होणें शक्य नाहीं. म्हणून तूं कुटुंबविषयक वासनांचा त्याग कर आणि संन्यासाश्रमाचा स्वीकार कर. पूर्वी सगरराजाला, तसेंच अंगराजालाहि संततीपासून फार दुःख सहन करावें लागलें. कौटुंबिक वासना दुःखालाच कारण असतात, म्हणून हा विचार सोडून तूं संन्यास घे. संन्यासधर्मांत सर्व प्रकारचें सुख आहे ॥ ३४–३६ ॥

ब्राह्मण म्हणाला—यतिमहाराज, अशा विवेकोपदेशानें माझें समाधान कसें होणार? शिवाय ज्याला संततिसुख मिळालें नाहीं त्याला संन्यासमार्ग निरुपयोगी मानला आहे. पुत्रपौत्रादि संततीनें युक्त असा ज्याचा गृहस्थाश्रम तोच या लोकीं श्रेष्ठ मानला आहे. करितां कसेंही करून मला पुत्र होईल असें करा. तसें न झालें तर मी आपणापुढें प्राणत्याग करीन! ॥ ३७, ३८ ॥

त्या ब्राह्मणाचा अशा प्रकारचा निश्चय पाहून संन्यासी म्हणाला—ब्राह्मणा, विधिलिखिताविरुद्ध प्रयत्न केल्यामुळें चित्रकेतु राजा अत्यंत दुःखी झाला. त्याचप्रमाणें तुझ्या प्रारब्धीं पुत्रसुख नसल्यामुळें तूं पुत्राची इच्छा करणें व्यर्थ होय; परंतु तूं तर पुत्रप्राप्तीकरितां अधीर झाला आहेस. तुला अधिक काय सांगूं? परंतु ज्या अर्थी तुझा आग्रहच आहे, त्या अर्थी तुला मी एक फळ देतों. हें फळ तूं आपल्या पत्नीला खावयाला दे; म्हणजे तिच्या ठिकाणीं तुला पुत्रप्राप्ति होईल; परंतु एक गोष्ट लक्षात ठेव. ह्या फळाचें सेवन केल्यापासून एक वर्षपर्यंत तुझ्या पत्नीनें व्रत पाळिलें पाहिजे तें व्रत म्हणजे खरें बोलणें, शुद्ध राहणें, सर्वांवर दया करणें, दानधर्म

करणें व एकभुक्त राहणें. अशा प्रकारें व्रतपालन केलें असतां तिला सुंदर मुलगा होईल ॥३९-४२॥ याप्रमाणें सांगून व तें फळ त्या ब्राह्मणास देऊन तो यति तेथून निघून गेला व तो आत्मदेव ब्राह्मणहि तें फळ घेऊन आपल्या घरीं परत आला. नंतर तें फळ त्यानें आपल्या पत्नीच्या हातीं दिलें, आणि यतीनें सांगितलेला वृत्तांत कथन करून तो तेथून स्वकार्यार्थ निघून गेला ॥४३॥ त्याची पत्नी तरुण होती; परंतु ती कपटी होती. ती आपल्या मैत्रिणीजवळ जाऊन रडूं लागली आणि म्हणाली, ‘ अहो ! माझ्या पतीनें मला संतति होण्यासाठीं दिलेलें हें फळ मीं कसें खावें याची काळजी वाटते. कारण खाल्लें तर मी गर्भिणी होईन आणि गर्भिणी झालें म्हणजे मला भोजन कसें करतां येईल ? मला मितभोजनच करावें लागेल आणि मग मला अशक्तता प्राप्त होईल. मी अशक्त झाल्यें म्हणजे मला घरांतील कामधंदा कसा करितां येईल ? ॥४४—४५॥ तसेंच घरांतून देवळांत व देवळांतून बागेंत, बागेंतून गांवांत हिंडायला कसें मिळेल ? मी गर्भिणी झाल्यें तर मला धांवतां येणार नाहीं. पिंजऱ्यांतील पोपटाप्रमाणें माझ्या उदरांत गर्भ राहील व त्याची पूर्ण वाढ झाल्यानंतर त्याला उदरांतून कसें बाहेर काढणार ? ॥४६॥ जर गर्भ बाहेर पडतांना आडवा आला तर कदाचित् मला मरणहि येईल ! मी तर अत्यंत सुकुमार आहें. अशा स्थितींत प्रसूतिकाळीं होणारें हें भयंकर दुःख मला कसें सहन करवेल ? ॥४७॥ मी अशक्त झाल्यें म्हणजे माझ्या नणंदा माझ्या घरांतील सर्व द्रव्याचा अपहार करतील ! शिवाय संन्याशानें वर्षभर पाळण्याचे जे सत्यशौचादि नियम सांगितले आहेत ते तर मला पाळतां येणें शक्यच नाहीं ॥४८॥ प्रसूतीनंतर मातेला अपत्याचें लालन पालन करण्यासाठीं फारच कष्ट सोसावे लागतात. वंध्या स्त्री व विधवा स्त्री ह्या अत्यंत सुखी होत असा माझा समज आहे ॥४९॥ अशा प्रकारें अनेक कुतर्क उत्पन्न झाल्यामुळें तें फळ तिनें भक्षण केलें नाहीं. पतीनें फळ खाल्लें का म्हणून विचारिलें असता तिनें फळ खाल्लें म्हणून सांगितलें ॥५०॥ एके दिवशीं त्या धुंधुलीची सख्खी बहीण सहज फिरतफिरत तिच्या घरीं आली. तिच्याजवळ ह्या धुंधुलीने वरील सर्व हकीगत सांगितली व म्हणाली, ह्या संततीसंबंधीं काळजीनें मी अगदीं गांजून गेलें आहे. काय करावें तें समजत नाहीं. त्यावर तिची धाकटी बहीण तिला म्हणाली, तूं अशी काळजी करूं नकोस. मी हल्लीं गरोदर आहे. मला जी संतति होईल ती उपजतांच मी तुला देईन, म्हणजे गर्भारपणाचें दुःख तुला सहन करावें लागणार नाहीं. तोंपर्यंत तूं गर्भिणीचें सोंग घेऊन घरांत गुप्त रीतीनें रहा. तूं माझ्या नवऱ्याला पुष्कळसें द्रव्य दिलेंस म्हणजे तो तुला माझें बालक देईल ॥५१, ५२, ५३॥ माझें मूल जन्म झाल्यानंतर मेलें असें लोक म्हणतील. मीं रोज तुझ्या घरीं येऊन त्या मुलाचें पोषण करीन ॥५४॥ तुझ्या पतीनें तुला जें फळ दिलें आहे तें तूं आतांच परीक्षा पाहण्यासाठीं गायीला खावयाला दे. ’ स्त्रीस्वभावानुसार कोत्या समजुतीच्या त्या धुंधुलीनें सर्व कांहीं तसें केलें ॥५५॥ नंतर कांहीं काळानें तिची बहीण प्रसूत झाली असतां तिच्या बालकाला घेऊन त्याचा पिता धुंधुलीच्या घरीं आला व

एकांतीं त्यानें तें बालक तिला दिलें ॥५६॥ त्या धुंधुलीनें आपल्या पतीला सुखानें प्रसूति होऊन पुत्र झाल्याबद्दल सांगितलें. आत्मदेव ब्राह्मणाला संतति झाली हें ऐकून लोकांनाहि समाधान वाटलें ॥५७॥ नंतर तो आत्मदेव ब्राह्मणपुत्राचा जातकर्म संस्कार करून ब्राह्मणांना पुष्कळ दानेंहि देता झाला. त्या ब्राह्मणाच्या द्वारीं मंगल गाणीं गाणें, व वाद्यें वाजविणें, वेदघोष वगैरे पुष्कळ मांगलिक कृत्यें होऊं लागलीं ॥५८॥ ती धुंधुली आपल्या पतीला म्हणाली, माझ्या स्तनांत दूध नाहीं. अर्थात दूध नसलेली मी बालकाचें पोषण कसें करूं? ॥५९॥ करितां नुकत्याच प्रसूत झालेल्या माझ्या सख्ख्या धाकट्या बहिणीचा बालक मृत झाला आहे, तिला आपण बोलावून आणून घरांत बाळगावी म्हणजे ती माझ्या बालकाचें पोषण करील ॥६०॥ पत्नीच्या इच्छेप्रमाणें त्या आत्मदेवानें पुत्ररक्षणासाठीं पत्नीच्या भगिनीस आपल्या घरीं आणून ठेवलें आणि त्या बालकाचें नांव धुंधुकारी असें ठेविलें ॥ ६१ ॥ त्याप्रमाणें तीन महिने निघून गेल्यानंतर त्याच्या गायीलाहि सुंदर मुलगा झाला! तो मुलगा सर्व अवयवांनीं पुष्ट असून, तेजस्वी, निर्मळ व सुवर्णाप्रमाणें कांति असलेला असा होता ॥ ६२ ॥ अशा त्या गायीच्या पुत्राला पाहून आत्मदेव ब्राह्मणाला आनंद झाला व तो त्याचेंहि सर्व जातकर्मादि संस्कार स्वतः करिता झाला. गायीला मनुष्यासारखा मुलगा झाला हें पाहून सर्व लोकांना आश्चर्य वाटलें; व ते त्या गोपुत्राला पाहण्यासाठीं तेथें जमा झाले आणि म्हणाले, ह्या आत्मदेव ब्राह्मणाचें दैव कसें उदयास आलें पहा!! याच्या गायीला सुद्धां देवासारखा तेजस्वी मुलगा झाला ॥ ६३, ६४ ॥ दुर्दैवानें त्यांतील खरें गुप्त रहस्य दुसऱ्या कोणालाहि ठाऊक नव्हतें. त्या पुत्राला कानच फक्त गाईसारखे असल्यामुळें आत्मदेवानें त्याचें नांव गोकर्ण असें ठेविलें ॥ ६५ ॥ कांहीं काळानें धुंधुकारी व गोकर्ण हे दोघे मुलगे तरुणपणाला प्राप्त झाले, गोकर्ण हा मोठा विचारशील व विद्वान् असा होता व धुंधुकारी अत्यंत दुष्ट स्वभावाचा होता ॥ ६६ ॥ धुंधुकारी हा नेहमीं स्नान नाहीं, पावित्र्य नाहीं, सदाचरण नाहीं, असा भ्रष्ट वर्तनाचा बनला. तो वाटेल तिथें वाटेल ती भिक्षा मागत असे. त्याचा स्वभाव तामसी असल्यामुळें सर्व लोक त्याचा तिरस्कार करूं लागले. तसेंच दुष्ट स्त्रियांशीं संबंध ठेवणें व प्रेतहस्तानें भोजन करणें इत्यादि गोष्टी तो करूं लागला ॥ ६७ ॥ चोरी करणें, सर्व लोकांशीं द्वेष करणें, दुसऱ्यांच्या घरांना आग लावणें, खेळवण्याकरितां म्हणून दुसऱ्यांच्या मुलांना धरून आणून एकदम विहिरींत फेकून देणें अशीं दुष्कृत्यें तो करूं लागला ॥ ६८ ॥ दुसऱ्यांना ठार मारणें, हातांत नेहमीं शस्त्र घेऊन फिरणें, दीनदुबळ्यांना पीडा देणें, नेहमीं स्वच्छंदानें हातांत पाश घेऊन चांडाळांच्या संगतींत राहणें, अशीं कुकर्में त्याच्या अंगीं जडलीं ॥ ६९ ॥ वेश्येच्या वाईट संगतीला लागून त्या धुंधुकारीनें पित्यानें मिळविलेलें जें कांहीं द्रव्य होतें तें सर्व उडवून टाकिलें. एके दिवशीं त्यानें स्वतः माता-पित्यांना ताडण करून घरांतील सर्व भांडींकुंडीं हिरावून घेतलीं. तेव्हां त्याचा पिता आत्मदेव, द्रव्य नष्ट झाल्यामुळें दीन होऊन मोठमोठ्यानें रडूं लागला व म्हणाला, 'दुःखदायी

अशा दुष्ट पुत्र होण्यापेक्षां निपुत्रिक असणें फार चांगलें! ॥ ७०, ७१ ॥ आतां मी कोठें राहूं ? कोठें जाऊं ? माझ्या दुःखाचा परिहार कोण करील ? आतां प्राणत्याग करण्याशिवाय अन्य मार्ग नाहीं. अरेरे, मला हें किती वाईट मरण येत आहे ॥ ७२ ॥ अशा रीतीनें आत्मदेव शोक करीत बसला असतां तो गोपुत्र, ज्ञानी गोकर्ण त्याजवळ आला आणि पित्याप्रमाणें पूज्य असलेल्या त्या आत्मदेवाला त्यानें ज्ञानोपदेश केला ॥ ७३ ॥ गोकर्ण म्हणाला, "ह्या संसारांत कोणत्याहि प्रकारचें सार नाहीं. खरोखर हा संसार दुःखरूप असून लोकांना मोहांत टाकणारा आहे. कोणाचा मुलगा व कोणाचें द्रव्य ! मनुष्य उगीच प्रेमवश होऊन त्याकरितां अहोरात्र तळमळ करीत राहतो ॥ ७४ ॥ द्रव्याभिलाषामुळें इंद्रालाही खरें सुख कधीं मिळत नाहीं; परंतु जो एकांतांत राहून उपजीविका करितो अशा वैराग्यशील मुनीलाच मात्र खरें सुख प्राप्त होतें ॥ ७५ ॥ आतां तूं पुत्राबद्दलचें अज्ञान सोडून दे. अज्ञानानें नरकप्राप्ति होत्ये. हा देह लवकरच पडणार असल्यामुळें सर्वांचा त्याग कर व अरण्यांत निघून जा !" ॥ ७६ ॥ अशा प्रकारें गोकर्णाचें भाषण ऐकून तो आत्मदेव ब्राह्मण म्हणाला, 'अरे बाबा गोकर्णा ! मी अरण्यांत जाऊन काय करावें, तें तूं मला विस्तारपूर्वक सांग ॥ ७७ ॥ हे दयासागरा गोकर्णा ! प्रेमपाशानें बद्ध झाल्यामुळें मी पांगळ्यासारखा होऊन ह्या काळोख्या विहिरींत माझ्या दुष्कर्मानें पडलों आहें. यांतून तूं माझा उद्धार कर !' ॥ ७८ ॥

गोकर्ण म्हणाला, 'हे ताता, हाडें, मांस व रक्त यांनीं बनलेल्या ह्या देहाचे ठिकाणीं असलेल्या प्रेमबुद्धीचा त्याग करा. तसेंच स्त्री, पुत्र यांचे ठिकाणीं असलेल्या माझे-पणाचा लोभ सोडा व हें जग नेहमीं क्षणांत नष्ट होणारें आहे, असें अहोरात्र पाहा. वैराग्यप्रेमानें युक्त व्हा आणि भक्तीचे ठिकाणीं प्रेम करणारे असे व्हा ! ॥ ७९ ॥ हे ताता, नेहमीं धर्माचें सेवन करा. लौकिक धर्माचा त्याग करा. सत्पुरुषांची सेवा करा. कामवासनेला जिंका. दुसऱ्याच्या गुणदोषाविषयींचें चिंतन सोडून द्या आणि नेहमीं भागवत-पूजन आणि भगवत्कथामृताचें प्राशन करा !' ॥ ८० ॥ याप्रमाणें गोकर्णानें केलेला उपदेश त्या आत्मदेव ब्राह्मणास पटला. त्या साठ वर्षांच्या उतारवयास प्राप्त झालेल्या आत्मदेवानें सर्व संसाराचा त्याग केला आणि नित्य नियमानें श्रीमद्भागवताच्या दशम-स्कंधाचा पाठ आणि योगयुक्त अंतःकरणानें भगवत्सेवा करूं लागला. त्यायोगें तो पाप-रहितहोत्साता नित्य व चिरस्थायी अशा श्रीकृष्णस्वरूपाला जाऊन मिळाला ॥ ८१ ॥

## चौथा अध्याय समाप्त

---

# अध्याय ५ वा

—*—

सूत म्हणतात, शौनक ऋषि हो, पिता आत्मदेव मृत झाल्यानंतर एके दिवशीं धुंधुकारीनें आपल्या मातेला पुष्कळ ताडण केलें आणि तो दुष्ट तिला म्हणाला, 'द्रव्य कोठें आहे तें सांग, नाहींपेक्षां लाथेखालीं बडवून काढीन !' ॥ १ ॥ पुत्राच्या या अशा भाषणानें व कृतीनें त्रस्त होऊन तिनें रात्रीं विहिरींत उडी टाकून जीव दिला. त्या वेळीं गोकर्ण हा तीर्थयात्रा करण्यासाठीं दूरदेशीं निघून गेला होता व योगसमाधींत निमग्न झाला होता. त्याला दुःख नाहीं, सुख नाहीं, वैरी नाहीं किंवा बांधव नाहीं अशी त्याची साम्यावस्था झाली होती ॥ २३ ॥ धुंधुकारी आतां पूर्णपणें स्वतंत्र झाला. त्यानें पांच वेश्या घरांत ठेवल्या व त्यांच्या पालनपोषणाचेंच वेड त्याला लागलें. तो त्यांतच अगदीं निमग्न असे व त्यांचें कांहींही कमी पडूं नये म्हणून तो वाटेल तीं क्रूर कृत्येंही करी ॥ ४ ॥ एके दिवशीं त्या पांच वेश्यांनीं त्याच्यापाशीं दागिने मागितले व त्यासाठीं त्या हट्ट धरून बसल्या. कामांधाला विचार कोठचा ? काहींही विचार न करितां तो लगेच तसाच दागिन्यांसाठीं घरांतून बाहेर पडला व जेथें संधि सापडली तेथें तेथें बेडरपणें चोरी करून त्यानें बहुत द्रव्य जमा केलें. नंतर त्या द्रव्याची चांगलीं उंची उंची वस्त्रें आणि दागिने खरेदी करून तो घरीं आला आणि ते त्यानें त्या वेश्यांस दिले ॥ ५,६ ॥ तो चौर्यसंपादित मोठा द्रव्यनिधि पाहून रात्रीं त्या वेश्यानीं विचार केला कीं, 'हा नेहमीं चोरी करितो, तेव्हां कधीं तरी राजाकडून पकडला जाईल ॥ ७ ॥ आणि तसें झालें म्हणजे याचें हें चोरीचें द्रव्य जप्त होऊन याला निःसंशय देहांताची शिक्षा होईल. यासाठीं ह्या द्रव्याच्या रक्षणाकरितां ह्याला आम्हीच गुप्त रीतीनें कां मारूं नये ? ॥ ८ ॥ ह्याला मारून याचें हे द्रव्य घेऊन आपण कोठें तरी निघून जाऊं !' याप्रमाणें विचार करून तो अमलांत आणण्याकरितां एकांत प्रसंग पाहून त्या वेश्यांनीं त्या धुंधुकारीला दोरांनीं बांधलें व त्याच्या गळ्यास फास लाविला आणि त्याचा प्राण हरण करण्याचा त्या प्रयत्न करूं लागल्या पण आश्चर्य हें कीं, तो त्यामुळें मरेना ! तेव्हां त्यांस मोठी काळजी वाटूं लागली. ॥ ९ ॥ १० ॥ शेवटीं त्यांनीं जळजळीत असे पुष्कळ निखारे त्याच्या तोंडावर आणून टाकीले ! या आसुरी उपायानें मात्र तो मृत झाला ॥ ११ ॥ नंतर त्या धाडसी व क्रूर वेश्यांनीं त्याच घरांत एक मोठा खड्डा खणून त्यामध्यें त्याचें शरीर पुरून टाकिलें आणि अशाप्रकारें त्यांनीं त्या आपल्या क्रूर कृत्याची आंतल्या आंत मोठ्या गुप्त रीतीनें जिरवाजिरवहि केली ॥ १२ ॥ धुंधुकारी जेव्हां बरेच दिवस दिसला नाहीं तेव्हां 'तुमचे यजमान कोठें गेले ?' असें त्यांना लोकांनीं विचारलें. त्यांनीं उत्तर

दिलें कीं, 'द्रव्यलालसेनें ते फार दूरच्या गांवीं गेले आहेत; ह्या वर्षी बहुतेक येतील' ॥ १३ ॥ विद्वान् पुरुषानें खोटें कर्म करणाऱ्या स्त्रियांवर कधींहि विश्वास ठेवूं नये. जो ठेवील तो अत्यंत दुःखी झाल्याशिवाय राहणार नाहीं ॥ १४ ॥ स्त्रियांचें भाषण मधुरादि षड्रसांना बाढविणारें असून अमृताप्रमाणें गोड असतें; पण हृदय वस्तऱ्याच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण असतें. अशा स्त्रियांना कोण बरें प्रिय वाटणार आहे ? ॥ १५ ॥ अनेक पतींशीं संलग्न होणाऱ्या त्या वेश्या धुंधुकारीला मारल्यानंतर त्याच्या घरांतील सारें द्रव्य घेऊन तेथून निघून गेल्या; परंतु तो धुंधुकारी मात्र अनेक पापकृत्यांमुळें पिशाच्च झाला ॥ १६ ॥ पिशाच्चयोनि प्राप्त झालेला तो वायुरूपानें इतस्ततः भ्रमण करीत असतां, अन्न-पाणी, शीत-उष्ण, यांनीं पीडित होऊन व्याकुळ होत्साता दाही दिशांस भ्रमण करीत असे. विश्रांतीचें स्थान म्हणून त्याला कोठें मिळेना. इकडे गोकर्ण तीर्थयात्रा करीत फिरत असतां त्याला त्याच्या मृत्यूची वार्ता कळली. तें वर्तमान ऐकून त्याला वाईट वाटलें आणि आपला बंधु धुंधुकारी अनाथ स्थितींत मरण पावला ही गोष्ट लक्षांत घेऊन त्यानें त्याच्या नांवानें गयाश्राद्ध केलें. आणि पुढें तो ज्या ज्या तीर्थाचे ठिकाणीं गेला तेथें तेथें त्यानें त्याच्या नांवानें पिंडदान करून श्राद्ध केलें ॥ १७-१९ ॥ याप्रमाणें तीर्थयात्रा करीत व धुंधुकारीचें तीर्थश्राद्ध करीत तो गोकर्ण आपल्या गांवाला परत आला व दुसऱ्याच्या नजरेस न पडतां रात्रीं आपल्या घराच्या अंगणांत गुप्तपणें येऊन निजला ॥ २० ॥ तो तेथें निजला असतां मध्यरात्रीच्या सुमारास धुंधुकारी पिशाच्चस्थितींत त्याच्यासमोर येऊन उभा राहिला ॥ २१ ॥ त्यानें एकदां मेंढ्याचें रूप घ्यावें, तर दुसऱ्या वेळीं हत्तीचें रूप घ्यावें व एखादे वेळीं तर रेड्याचें रूप घ्यावें ! अशीं त्यानें नाना रूपें घेतलीं. इन्द्र, अग्नि ह्यांचींहि त्यानें मधून मधून रूपें घेतलीं व शेवटीं मात्र तो पुरुषरूपानें पुढें आला ॥ २२ ॥ हा सर्व विपरीत प्रकार पाहून त्या धीरमंत गोकर्णास आश्चर्य वाटलें आणि तो मनाशीं म्हणाला, "हा कोणी तरी वाईट योनींत जन्माला आलेला पिशाच्च असावा.'" असा विचार करून तो त्याच्याशीं बोलूं लागला ॥ २३ ॥

गोकर्ण म्हणाला, भयंकर रूप धारण करणारा असा तूं कोण आहेस ? तूं येथें कोठून आलास ? तुझी अशी वाईट अवस्था कशानें झाली ? तूं प्रेत आहेस, पिशाच्च आहेस, कीं राक्षस आहेस, हें एकंदर वर्तमान सांग ॥ २४ ॥

सूत म्हणतात, हे शौनका, याप्रमाणें गोकर्णानें धुंधुकारी पिशाच्चाला विचारिलें असतां तो धुंधुकारी पिशाच्च व्याकुळ होऊन रडूं लागला. शब्दोच्चार करण्यास असमर्थ असल्यामुळें मनांतील भाव तो खुणांनीं दर्शवूं लागला. पिशाच्च बोलत नाहीं असें पाहून गोकर्णानें कमंडलूंतील उदक घेऊन तें त्याच्या अंगावर फेंकिलें. त्या पवित्रोदकाचा स्पर्श होतांच तो तत्काल पापमुक्त झाला, आणि त्यानें बोलण्यास सुरवात केली ॥ २५, २६ ॥

पिशाच्च म्हणाला, 'मी तुझा भाऊ आहे. माझें नांव धुंधुकारी. मी स्वतःच्या

दोषानेंच ब्राह्मण्याला मुकलों ॥ २७ ॥ अज्ञानानें युक्त होऊन मी फिरत असतां माझ्या हातून असंख्य दुष्कृत्यें घडलीं आणि शेवटीं लोकांची हिंसा करणारा असा जो मी, त्या माझे हालहाल करून स्त्रियांनीं मला मारिलें. आणि ह्यामुळें मी ह्या पिशाच्चपणाला प्राप्त झालों. आतां ह्या पिशाच्चयोनींतील माझी दुर्दशा मी सांगतों. कर्मगतीच्या फळानुरूप हल्लीं वायु भक्षण करून त्यावरच मला निर्वाह चालवावा लागतो. हे दयासागरा गोकर्णा, हे साहाय्यकर्त्या बंधो, माझी ह्या योनींतून लवकर मुक्तता कर !' हें त्याचें भाषण ऐकून गोकर्ण त्याशीं बोलूं लागला ॥ २८, २९, ३० ॥

गोकर्ण म्हणाला, धुंधुकारे, तुला मुक्ति मिळावी म्हणून गयाक्षेत्रीं जाऊन तुझ्या नांवानें पिंडदानादि विधि मीं यथाशास्त्र केले. असें असतां तुला मुक्ति कां मिळाली नाहीं, याचें मला आश्चर्य वाटतें. गयाश्राद्धानेंहि तुला मुक्ति मिळत नाहीं, तर मुक्ति देणारा असा दुसरा कोणता उपाय करूं तें तूंच मला सांग. तुला मुक्ति देणारा असा दुसरा उपाय मला तरी कांहीं दिसत नाहीं ॥ ३१, ३२ ॥

पिशाच्च म्हणाला,—हे श्रेष्ठ गोकर्णा, माझ्या नांवानें शंभर श्राद्धें जरी केलीं तरी मला मुक्ति मिळेल असें वाटत नाहीं. यासाठीं माझ्या मुक्तीकरितां कांहीं तरी निराळा उपायच शोधून काढ ! ॥ ३३ ॥ असें त्या पिशाच्चाचें भाषण ऐकून गोकर्णाला मोठें आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, शंभर गयाश्राद्धांनींहि जर तुला मुक्ति मिळणार नसेल तर खरोखर तुला मुक्ति मिळणें अशक्यच दिसतें. तथापि हे पिशाच्चा, आतां तूं निर्भयपणें खुशाल आपल्या स्थानीं स्वस्थ राहा. तुला मुक्ति देणारें जर एखादें साधन असेल तर त्याचा विचार करून त्याचें अनुष्ठान करीन' ॥ ३४, ३५ ॥

गोकर्णाच्या ह्या अशा आश्वासनानंतर धुंधुकार आपल्या स्थानीं निघून गेला व गोकर्ण त्या धुंधुकाराला मुक्ति कशी मिळेल याचा विचार करूं लागला. त्या रात्रीं त्याला त्याविषयी कांहींएक युक्ति सुचली नाहीं ॥ ३६ ॥ दुसरे दिवशीं सकाळीं, गोकर्ण आला आहे हे वर्तमान समजतांच गांवांतील लोक प्रेमानें त्याला भेटावयाला आले. परस्परांचे क्षेमसमाचार झाल्यानंतर गोकर्णानें रात्रीं घडलेली सर्व हकीगत त्यांना सांगितली ॥ ३७ ॥ त्या समूहांत असलेल्या विद्वान्, योगी, ज्ञानी व ब्रह्मवेत्ते अशा सर्वांनीं त्यासंबंधांत अनेक ग्रंथ चाळून खोल विचार केला, परंतु धुंधुकारीला मुक्ति मिळण्याचें साधन कांहीं त्यांना सांपडलें नाहीं ॥ ३८ ॥ शेवटीं त्या सर्वांनीं एकमतानें सांगितलें कीं, 'हे गोकर्णा, तूं याबद्दल सूर्याला विचार व सूर्य जसें सांगेल त्याप्रमाणें वाग !' हें असें विद्वानांचें भाषण ऐकून गोकर्णानें तत्क्षणीं सूर्याच्या गतीचें स्तंभन केलें आणि त्याला म्हणाला ॥ ३९ ॥ "हे जगाला साक्षिरूप असणाऱ्या सूर्या, तुला नमस्कार असो. मुक्ति देण्यास समर्थ असें एखादें साधन मला सांग !" तें गोकर्णाचें भाषण ऐकून सूर्य दुरूनच स्पष्ट रीतीनें त्याला बोलला ॥ ४० ॥

" हे गोकर्णा, सात दिवसांत भागवताचें पारायण केलें असता मुक्ति मिळते, तूं त्याचें वाचन कर ! " तें सूर्याचें धर्मरूप भाषण सर्वांनीं स्पष्ट रीतीनें श्रवण केलें आणि म्हणाले, "अहो, हें तर अगदी सोपें आहे. कसेंही करून ह्या भागवतसप्ताहाचें पारायण करावें म्हणजे झालें!" नंतर गोकर्णानें निश्चय करून श्रीमद्भागवताच्या सप्ताहाला सुरुवात केली. त्या वेळीं भागवताचें श्रवण करण्यासाठीं अनेक देशांतून अनेक लोक तेथें प्राप्त झाले. आंधळे, पांगळे, वृद्ध, आळशी वगैरे सर्व पापी लोक पापनाशार्थ तेथें आले ॥ ४१–४२ ॥ त्या वेळीं देवांनाहि आश्चर्य वाटण्यासारखा मोठा समाज तेथें एकत्र जमला. नंतर गोकर्ण व्यासपीठावर बसून भागवत-कथा वाचण्यास सुरुवात करूं लागला. इतक्यांत तो धुंधुकारी पिशाचहि तेथें आला आणि बसण्यासाठीं जागा शोधूं लागला. तों तेथें एक सात पेरें असलेला उंच वेळूचा वृक्ष त्याच्या दृष्टीस पडला ॥ ४४ ॥ ४५ ॥ लगेच तो त्याच्या मुळाशीं एक भोंक होतें त्यांतून आंत शिरला व तेथें स्वस्थपणें भागवत श्रवण करीत बसला. पिशाच वायुरूपानेंच राहणारें असल्यामुळें स्थानाशिवाय राहणें त्यास अशक्य झालें व म्हणून त्यानें तसें केलें ॥ ४६ ॥ अशा प्रकारें तयारी झाल्यानंतर विष्णुभक्त अशा एका श्रेष्ठ ब्राह्मणाला मुख्य श्रोता करून गोकर्णानें आरंभापासून स्पष्टपणें भागवत वाचण्याला सुरुवात केली ॥४७ ॥ संध्याकाळीं जेव्हां वाचन पुरें करून तो भागवताची पोथी वेष्टनांत बांधून ठेवूं लागला तेव्हां एक आश्चर्यकारक गोष्ट घडून आली. ती ही कीं, सर्व लोकांसमक्ष समोरच असलेल्या एका वेळूच्या गांठीचा भेद होऊन ": ताडताड" असा मोठा शब्द झाला ॥ ४८ ॥ दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं त्याचप्रमाणें त्याच वेळूची दुसरी गांठ फुटली. तिसरे दिवशीं संध्याकाळीं त्याचप्रमाणें त्याच वेळूची तिसरी गांठ फुटली ॥ ४९ ॥ याप्रमाणें सात दिवसांत सात गांठींचा भेद झाला. याप्रमाणें सात दिवसांत श्रीमद्भागवताच्या बारा स्कंधांचें श्रवण झाल्यामुळें त्या धुंधुकारीची वेळूच्या गांठींचा भेद होऊन पिशाचयोनींतून मुक्तता झाली ॥ ५० ॥ लगेच तो तेजस्वी रूपाचा, तुळशीच्या माळा गळ्यांत घातलेला, पिंवळें वस्त्र नेसलेला, नीलकांति धारण केलेला, मुकट व कुंडलें घातलेला असा दिव्य पुरुष दिसूं लागला ॥ ५१ ॥ तत्काळ तो बंधु गोकर्णाला नमस्कार करून म्हणाला, ' हे बंधो, तूं दयाळूपणें मला पिशाचयोनींत पाडणाऱ्या पापजन्य बंधापासून मुक्त केलें आहेस ॥ ५२ ॥ पिशाच्चाचें दुःख दूर करणारी श्रीमद्भागवतांतील कथा खरोखर धन्य होय. तसेंच विष्णुलोकाची प्राप्ति करून देणारा भागवतसप्ताहहि धन्य होय ॥ ५३ ॥ भागवतसप्ताहाचें श्रवण केलें असतां सर्व पातकें थरथर कांपूं लागतात. आणि आम्हां पिशाच्चयोनींतील प्राण्यांची तींतून मुक्तता होत्ये ॥ ५४ ॥ ज्याप्रमाणें अग्नि काष्ठाचें दहन करितो, त्याप्रमाणें भागवताचें श्रवण, वाणीनें, मनानें वा कर्मांनीं घडलें असतां नवेंजुनें, लहानमोठें, पाप जाळून टाकितें ॥ ५५ ॥ एकदां देवांनीं देवांच्या सभेंत सांगितलें कीं, ' ह्या भरतखंडांत जन्म घेऊन जर लोकांनीं भागवतकथेचें श्रवण केलें नाहीं, तर त्यांचा तो जन्म खरोखर निष्फळ होय ! ॥ ५६ ॥ भागवतकथेचें

श्रवण न करितां केवळ अज्ञानानें शरीराचें रक्षण करणें, खाऊन-पिऊन व व्यायाम करून तें बळकट बनविणें इत्यादि फुकट होय. कारण शरीर क्षणभंगुर असल्यामुळें पारमार्थिक कल्याण करणारी भागवतकथा श्रवण न करितां केवळ शरिराचे चोंचले करण्यांत काय फायदा ? ॥ ५७ ॥ शरीर हें हाडांवर उभारलेलें आहे; शिरांनीं बांधून काढिलेलें आहे; मांस व रक्त ह्यांनीं लेपिलेलें आहे; चामड्यानें वेष्टिलेलें आहे आणि मलमूत्राच्या दुर्गंधीचें भांडेंच असें आहे ॥ ५८ ॥ पुनः हें शरीर वृद्धावस्था व शोक ह्यांनीं पीडिलेलें, रोगाचें घर व मृत्यूचें स्थान असें आहे. ह्यांचें पूरण करणें कठीण आहे. ह्यांचें धारण करणेंहि कठीण आहे. हें शरीर दोषयुक्त असून क्षणांत नष्ट होणारें आहे ॥ ५९ ॥ आणि शेवटीं कृमि, विष्ठा किंवा भस्म यामध्येंच याचा अंत म्हणजे परिणाम होणारा आहे असें शास्त्रादिक म्हणतात. अशा तऱ्हेनें हें शरीर अगदीं क्षणभंगुर असतां मनुष्य तद्द्वारा चिरकाल टिकणारें असें सत्कृत्य कां बरें करीत नाहीं ? ॥६०॥ सकाळीं शिजविलेलें अन्न जर संध्याकाळीं नासून जातें, तर अशा झटपट नासून जाणाऱ्या अन्नाच्या रसानें पुष्ट झालेल्या शरिरांत चिरकालिक टिकाऊपणा कोठून असणार ? ॥६१॥ मात्र भागवतसप्ताहाच्या श्रवणानें याचे सर्व दोष निरसन पावतात आणि ह्याच लोकीं भगवत्प्राप्ति होते. सारांश भागवतसप्ताह हें उत्कृष्ट साधन आहे ॥६२॥ पाण्यांतील बुडबुडे अगर पाण्यांतील किडे जसे निबळ नष्ट होण्यासाठींच उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें भगवत्कथेचें श्रवण न करणारे पुरुषही केवळ मरण्यासाठींच जन्मास आलेले असतात ॥ ६३ ॥ जेथें भागवतसप्ताहश्रवणानें जड व सुकलेल्या वेळूच्या गांठीहि ताडताड फुटल्या, तेथें भागवतश्रवणानें मनुष्यांच्या अंतःकरणांतील वासनारूप गांठ फुटेल ह्यांत काय आश्चर्य ? ॥६४॥ सप्ताहाचें श्रवण केलें असतां अंतःकरणांतील वासनारूप ग्रंथि छिन्नभिन्न होते, सर्व संशयांचा नाश होतो आणि सारीं पापें नाश पावतात ॥६५॥ संसाररूपी चिखलाचा शरीराला लागलेल्या लेपाचा नाश करण्यांत कुशल अशी जी भागवतकथा तेंच कोणी एक तीर्थ, तें अंतःकरणांत राहिलें असतां मोक्षप्राप्ति होते असें विद्वान् लोक सांगतात.' ॥६६॥ याप्रमाणें तो धुंधुकारी बोलत आहे, इतक्यांत त्या ठिकाणीं एक विमान येऊन दाखल झालें. त्यामध्यें वैकुंठांत राहणारे विष्णुदूत बसले होते. ते मोठ्या दैदीप्यमान कांतीनें शोभत होते. त्या विमानांत तो धुंधुलीचा पुत्र धुंधुकारी सर्वांसमक्ष जाऊन बसला. नंतर विमानांत असणाऱ्या त्या वैष्णवांना उद्देशून गोकर्ण बोलूं लागला ॥६७॥६८॥

गोकर्ण म्हणतो—अहो वैष्णव हो, ह्या माझ्या श्रोतृसमाजामध्यें पुष्कळ निर्मळ साधु आहेत. असें असतां फक्त एकालाच तेवढी मुक्ति मिळावी असा भागवतश्रवणाच्या फलामध्यें भेदभाव कां ? ॥६९॥ वैष्णवहो, येथें बसून सर्वांनीं सारख्या रीतीनें कथाश्रवण केलें आहे. असें असतां एकालाच तेवढें विमान यावें याचें काय बरें कारण ? ॥७०॥

वैष्णव म्हणतात—ह्याच्या श्रवणांत व इतरांच्या श्रवणांत पुष्कळ भेद झाला आहे व ह्यासाठींच ह्याच्या फलांत व इतरांच्या फलांतही भेद झाला आहे. सर्वांनीं फक्त श्रवण केलें; परंतु त्याचें मनन केलें नाहीं ॥७१॥ हे मान्यवंत गोकर्णा, ह्या पिशाच्चानें सात रात्री उपवास करून स्वस्थ चित्तानें भागवतश्रवण केलें आणि आपला सर्वकाळ त्याच्याच चिंतनांत घालविला. तसें इतरांकडून झालें नाहीं ॥ ७२ ॥ त्याचप्रमाणें स्वस्थ अंतःकरणानें मननादिहि यानें उत्तम रीतीनें केलें आहे. जर ज्ञानांत बळकटी नसेल तर तें ज्ञान नष्ट होतें. दुर्लक्षपणें केलेलें श्रवण निष्फळ होतें ॥७३॥ मंत्र जर संशयात्मक असेल तर तो व्यर्थ होतो. एकाग्र अंतःकरण नसतांना जर जप केला तर तो फुकट होय, ज्या देशांत विष्णुभक्त नाहीं तो देश नाश पावतो. अयोग्य ब्राह्मणाला क्षण देऊन केलेलें श्राद्ध फुकट जातें ॥ ७४ ॥ जो अग्निहोत्रादि यज्ञयाग करीत नाहीं त्याला दान दिलेलें निरर्थक होय. सदाचाररहित कुळाचा नाश होतो. करितां गुरुवाक्यावर विश्वास ठेवावा आणि दीन असावें ॥ ७५ ॥ मनांतील दोष दूर करावे, भगवंताच्या कथेचे ठिकाणीं बुद्धि स्थिर करावी. अशा रीतीनें श्रवण केलें असतां श्रवणाचें योग्य फळ तत्काळ मिळतें ॥ ७६ ॥ हे गोकर्णा ! तूं पुनः भागवतसप्ताहाचें पारायण कर व पुनः जेव्हां हे सर्व लोक वर सांगितल्याप्रमाणें भागवतकथांचें श्रवण करितील तेव्हां ह्या सर्वांना विष्णुलोकाची प्राप्ति अवश्य होईल. श्रीविष्णु स्वतः तुला गोलोकाची प्राप्ति करून देतील ॥ ७७ ॥ याप्रमाणें बोलून ते भागवत्कीर्तन करणारे सर्व वैष्णव वैकुंठलोकाला निघून गेले. पुढें गोकर्णानें पुन्हा श्रावणाच्या महिन्यांत त्याचप्रमाणें भागवतसप्ताहपारायण केलें ॥ ७८ ॥ त्या वेळीं त्या सर्व लोकांनीं पुन्हां सात रात्रींपर्यंत वैष्णवांनीं उपदेशिल्याप्रमाणें भागवतकथा श्रवण केली. शेवटच्या दिवशीं कथा समाप्त झाल्यानंतर जें कांहीं घडून आलें तें हें नारदा, तुला सांगतों. श्रवण कर ॥ ७९ ॥ श्रीविष्णु स्वतः विमानांत बसून कित्येक विष्णुभक्तांसह तेथें प्रकट झाला. त्या वेळीं तेथें "जय जय" व "नमः नमः" या शब्दांची मोठी गर्जना झाली ॥ ८० ॥ श्रीविष्णूनें स्वतः आनंदांच्या भरांत तेथें पाञ्चजन्य नांवाचा शंख वाजविला व गोकर्णाला आलिंगन देऊन त्याचें स्वतःसारखें स्वरूप बनविलें ॥ ८१ ॥ दुसरेहि जें कांहीं श्रोते होते त्यांनाहि तत्काळ त्यानें मुक्त करून मेघाप्रमाणें नीळ वर्णाचे, पिंवळें रेशमी वस्त्र आणि मुकुट व कुंडलें धारण केलेले असें बनविलें ॥ ८२ ॥ फार काय, पण त्या गांवांतील कुत्रे, चांडाळ वगैरे सर्वसामान्य प्राण्यांनासुद्धां गोकर्णाच्या कृपाजनक प्रार्थनेवरून दोषमुक्त करून विमानांत बसविलें, आणि जेथें योगी जातात त्या वैकुण्ठलोकामध्यें पाठवून दिलें व आपण स्वतः गोकर्णासह गोपप्रिय अशा गोलोकाला गेला ॥ ८३ ॥ ॥ ८४ ॥ पूर्वी अयोध्येंत राहणारे लोक रामाशीं मैत्री करून मुक्तीला गेले, त्याप्रमाणें ते सारे वैष्णव कथाश्रवणाच्या योगें वैकुंठलोकीं गेले ॥ ८५ ॥ ज्या ठिकाणीं सूर्य, चंद्र व सिद्ध पुरुष यांनाहि जातां येत नाहीं व योग्यांनाहि

# अध्याय ६ वा

---

सनत्कुमारादि ऋषि म्हणतात—हे नारदा, आतां तुम्हांला भागवतसप्ताहाच्या श्रवणाचा विधि सांगतों. हा विधि द्रव्यादिकांनीं व इतर साधनभूत वस्तूंनींच प्रायः साध्य होणारा आहे, असें वर्णिलें आहे ॥ १ ॥ प्रथमतः ज्योतिषाला बोलावून सप्ताहारंभ करण्यासाठीं मुहूर्त विचारावा आणि त्या मुहूर्तावर त्याला सुरवात करावी. जितकें द्रव्य आपण विवाहासारख्या समारंभासाठीं खर्चितों, तितकें द्रव्य ह्या सप्ताहासाठीं खर्चावें ॥ २ ॥ भाद्रपद, आश्विन, कार्तिक, मार्गशीर्ष, आषाढ व श्रावण, हे सहा महिने भागवतसप्ताहाच्या कथेला योग्य म्हणून सांगितले असून हेच महिने श्रोत्यांना मोक्ष देणारे आहेत ॥ ३ ॥ ज्या ज्या महिन्यांत जे जे पदार्थ निषिद्ध व अहितकारी म्हणून सांगितले असतील. त्या त्या पदार्थांचा सर्व प्रकारें त्याग करावा; व इतर उपयोगांत घ्यावे. तसेंच ह्या कार्यासाठीं जे जे योग्य मदत करणारे असतील त्याचें साहाय्य घ्यावें ॥ ४ ॥ " अमुक ठिकाणीं भागवतकथेच्या सप्ताहाचें पारायण चालू होणार आहे; तेव्हां सर्वांनीं सहकुटुंब सहपरिवार श्रवणासाठीं यावें. " अशा तऱ्हेनें ही बातमी पत्रें वगैरे पाठवून शक्य त्या उपायांनीं सर्वत्र प्रसृत करावी ॥ ५ ॥ भगवंताच्या कथा किंवा भगवत्कीर्तन जरी दूरच्या पल्ल्यावर होणार असलें तरी दूरदेशस्थ अशाही स्त्रीशूद्रादि लोकांना त्यांबद्दलची माहिती ज्यायोगें मिळेल व ज्यायोगें त्यांना कथाश्रवणचा लाभ होऊन ज्ञानप्राप्ति होईल अशाविषयीं प्रयत्न करावा ॥ ६ ॥ भगवत्कीर्तनाच्या श्रवणाविषयीं उत्कंठित असे वैराग्यशील वैष्णव जेथें जेथें असतील तेथें तेथें त्यांना पत्रें पाठवावीं; व त्या पत्रांत " अमुक ठिकाणीं भागवतसप्ताह-पारायण होणार आहे " असा मचकूर असावा ॥ ७ ॥ तसेंच आणखी असेंही लिहावें कीं, " येथें सात दिवसपर्यंत अत्यंत दुर्लभ असा साधूंचा मोठा समाज जमणार आहे आणि पूर्वी कधींही उपलब्ध न झालेली अशीं अनिर्वचनीय भगवत्कथा सुरू होणार आहे ॥ ८ ॥ करितां भगवत्कथाश्रवणाविषयीं उत्सुक व प्रेमळ असे आपण श्रीमद्भागवतकथामृताचें प्राशन करण्यासाठीं लवकर या ॥ ९ ॥ जर आपणाला येथें येऊन सात दिवस भागवतकथेचें श्रवण करण्यास अवकाश नसेल तर निदान एक रात्र तरी या. येथील प्रत्येक क्षण अत्यंत दुर्लभ होय " ॥ १० ॥ याप्रमाणें मोठ्या नम्रपणें यथावत् सर्व वैष्णवांना आमंत्रण द्यावें; व आलेल्या त्या सर्वांना राहण्यासाठीं घरें वगैरेचीही व्यवस्था करावी ॥ ११ ॥ भागवतकथाश्रवण तीर्थाचे ठिकाणीं, अरण्यांत अथवा घरांत कोठेंहि करावें; मात्र ती जागा सारा समाज बसण्यासारखी मोठी विस्तृत अशी असावी ॥ १२ ॥ कथाश्रवणासाठीं ठरविलेली जागा केरकचरा काढून साफ करावी; व पाणी शिंपडून

स्वच्छ करावा. नंतर गाईच्या शेणानें ती सारवावी. बिळें, खड्डे वगैरे असल्यास तें बुजवून टाकावे. घरांतील निरुपयोगी भांडीकुंडीं वगैरे अडगळ उचलून एका कोंपऱ्यांत सांठवून लोकांना बसण्यासाठीं जागा मोकळी करावी. उपयुक्त असतील तीं भांडीं घासून स्वच्छ करून घ्यावीं ॥ १३ ॥ कथेला प्रारंभ करण्यापूर्वी पांच दिवस अगोदर बैठकी वगैरे मिळवून आणाव्यात. मोठा मांडव घालावा. उंच उंच केळीचीं झाडें उभारून त्यांच्या तोरणांच्या योगानें मांडवाला शोभा आणावी ॥ १४ ॥ शोभेसाठीं फळें, फुलें व आंब्याचे ढाळे वगैरेही टांगावे; तसेंच छतही लावावें. मंडपाच्या चारी दिशांना गुढ्या उभाराव्या व अशा रीतीनें हरतऱ्हेनें मांडवाला शोभा आणावी, त्या कामीं कृपणपणा करूं नये ॥ १५ ॥ एकावर दुसरा, दुसऱ्यावर तिसरा, या प्रमाणें सात लोकांची विस्तारपूर्वक तेथें कल्पना करून तेथें विरक्त ब्राह्मणांची जागृतिपूर्वक स्थापना करावी ॥ १६ ॥ प्रथमतः इतर ब्राह्मणांना अनुक्रमानें आसनें नेमून देऊन नंतर वक्त्यालाहि एक मोठें उंची असें दिव्य आसन द्यावें व वक्त्यानें तोंड उत्तरेकडे असल्यास श्रोत्यांनीं पूर्वाभिमुख बसावें, व वक्ता पूर्वाभिमुख बसला असल्यास श्रोत्यानीं उत्तराभिमुख बसावें ॥ १७-१८ ॥ किंवा पूज्य आणि पूजक यांच्यामध्यें पूर्वदिशा मुख्यत्वेंकरून योग्य समजावी. देश, काल वगैरे जाणणाऱ्या कुशल ज्योतिष्यांनीं श्रोत्यांच्याकरितां हीच पूर्व दिशा उक्त ठरविली आहे ॥ १९ ॥ कथा वाचणारा वक्ता विरक्त, विष्णुभक्त, ब्राह्मण, वेद व शास्त्र यांच्या अध्ययनानें अन्तःकरण शुद्ध झालेला, अनेक कथा सांगण्यांत निपुण, पंडित, बोलण्यांत प्रवीण व अत्यंत निःस्पृह असा असावा; व अशाच वक्त्यांची येथें योजना करावी ॥ २० ॥ जे अनेक प्रकारचे धर्म ऐकून भ्रमिष्टासारखे झाले आहेत, जे स्त्रीलंपट आहेत, जे नास्तिक व पाखंड मताचे आहेत, ते जरी विद्वान् असले तरी भागवतकथांचें प्रवचन करण्याचे कामीं त्याज्य होत ॥ २१ ॥ वक्त्याला साहाय्य करण्यासाठीं तशाच अधिकाराचा विद्वान, सर्व संशयांचा निरास करणारा व लोकांना ज्ञानोपदेश करण्यास तत्पर असा एक दुसरा वक्ता मुख्य वक्त्याच्याच बाजूला बसवून ठेवावा ॥ २२ ॥ भागवतसप्ताहपारायण-व्रताची फलप्राप्ति व्हावी एतदर्थ सप्ताहाला प्रारंभ करण्याच्या पूर्वदिवशीं वक्त्यानें क्षौर करावें. नंतर दुसऱ्या दिवशीं अरुणोदयकाळीं शौचविधि उरकून वेऊन स्नान करावें ॥ २३ ॥ थोडक्यांत संध्यादि आन्हिक कृत्य आटपावें. नंतर कोणत्याहि प्रकारचें विघ्न येऊं नये म्हणून गणपतीची पूजा करावी ॥ २४ ॥ पितरांना तर्पणादि विधीनें तृप्त करून शरीरशुद्ध्यर्थ प्रायश्चित्त आचरावें. नंतर मण्डलाकार भूमि शुद्ध करून तीवर ब्रह्मादि मंडलदेवतांसह श्रीकृष्णाची स्थापना करावी ॥ २५ ॥ नंतर त्याची समंत्रक पूजा करून त्याला प्रदक्षिणा घालाव्या व नमस्कार करावा. शेवटीं त्याची " हे दयासागरा श्रीकृष्णा, संसारसमुद्रांत बुडालेल्या दीनबाण्या अशा मला व कर्मविषयींच्या अज्ञानानें ज्याचे सर्व अवयव जखडून गेले आहेत अशा मला संसारसमुद्रांतून वर काढा. " याप्रमाणें प्रार्थना करावी ॥ २६-२७ ॥ नंतर मोठ्या समारंभानें श्रीमद्भागवतग्रंथाची पूजा करावी.

यथाविधि मंत्र म्हणून धूप, दीप वगैरे उपचारांनीं भागवताची पूजा केल्यानंतर हातांत नारळ घेऊन नमस्कार करावा व प्रसन्न अन्तःकरणानें पुनः प्रार्थना करावी ॥ २८ ॥ ॥ २९ ॥ "श्रीमद्भागवत नांवाचा ग्रंथ हा खरोखर प्रत्यक्ष श्रीकृष्ण होय; करितां हे श्रीकृष्णा, संसारसागरांतून सुटका व्हावी एवढ्यासाठीं मी तुझा स्वीकार करीत आहें ॥ ३० ॥ हे श्रीकृष्णा, मी तुझा सेवक आहें. माझा हा श्रीमद्भागवतसप्ताह निर्विघ्नपणें पार पाडावा एवढी माझी इच्छा सर्वप्रकारें सफल करावी." ॥ ३१ ॥ याप्रमाणें नम्रपणें भगवंताची प्रार्थना केल्यानंतर वक्त्याचें पूजन करावें. त्याला वस्त्रें व अलंकार द्यावे. याप्रमाणें वक्त्याची पूजा झाल्यानंतर त्याची प्रार्थना करावी ॥ ३२ ॥ "सर्व शास्त्रांत कुशल व ज्ञानदानविधि जाणणाऱ्या हे शुकस्वरूप पौराणिका, ह्या भगवतकथांचें प्रकाशन करून माझें अज्ञान नष्ट कर." ॥ ३३ ॥ नंतर व्रतसांगतेकरितां सात दिवस यथाशक्ति मौनादि नियम तसेच दुसरेहि ब्रह्मचर्यादि नियम निष्ठापूर्वक पाळावेत ॥ ३४ ॥ कथेचा भंग होऊं नये म्हणून दुसरे पांच ब्राह्मण नियोजावे व त्यांना "ॐ नमो भगवते वासुदेवाय" ह्या बारा अक्षरी मंत्राचा जप करण्यास सांगावें ॥ ३५ ॥ ब्राह्मण, वैष्णव व त्याचप्रमाणें इतर जे दुसरे भगवद्भक्त असतील त्यांना, तसेंच भगवंताचें कीर्तन करणारे जे कीर्तनकार असतील त्यांना, नमस्कार करून व त्यांचें पूजन करून त्यांनीं आज्ञा दिल्यावर स्वतः आसनावर बसावें ॥ ३६ ॥ इतर लोक, पदार्थ, द्रव्य, गृह व पुत्र यांसंबंधींची म्हणजे संसारव्यवहारासंबंधींची सर्व काळजी सोडून देऊन सारें लक्ष कथेकडेच द्यावें व शुद्ध बुद्धीनें कथाश्रवण करावें. याप्रमाणें वागणारालाच सप्ताहाचें श्रेष्ठ फळ मिळतें ॥ ३७ ॥ बुद्धिमान् अशा वक्त्यानें सूर्योदयीं मोठ्या गंभीरपणें कथेला प्रारंभ करून ती साडेतीन प्रहरपर्यंत चालवावी ॥ ३८ ॥ दुपारीं दोन घटकांपर्यंत विश्रांती घ्यावी. हा सप्ताह चालू असतां रोज कथावाचनाखेरीजच्या मध्यंतरीं मिळणाऱ्या वेळांत वैष्णवांचें भगवत्कीर्तन, भजन वगैरे वगैरे चालू असावें ॥ ३९ ॥ शौचविधि व लघुशंका यासाठीं कथेंतून मध्येंच उठून जाण्याची पाळी येऊं नये म्हणून सात दिवस हलका आहार करावा, कीं ज्यायोगें पुष्कळ वेळ एके जागीं बसण्यास अडचण पडणार नाहीं. कथा ऐकण्याची इच्छा करणाऱ्यानें एक वेळ हविष्यान्नाचेंच सेवन करावें ॥ ४० ॥ सामर्थ्य असेल तर सप्ताहाचे सात दिवस उपवासच करावा. या उपोषणामध्यें तूप किंवा दूध प्यावयास हरकत नाहीं. या प्रकारच्या उपोषणामुळें सुखानें कथाश्रवण करितां येतें ॥ ४१ ॥ याप्रमाणें ही उपोषण करण्याची शक्ति नसल्यास फलभक्षण करून किंवा एक वेळ हलकें अन्न खाऊन कथाश्रवण करावें; तात्पर्य, भागवतकथा श्रवण करण्यासाठीं जें सहज सुखानें होण्यासारखें असेल तेंच करावें; उगीच भलतेच कष्ट घेण्याची जरूरी नाहीं ॥ ४२ ॥ उपवास केल्यानें जर कथाश्रवणाकडे लक्ष लागत नसेल आणि भोजन केल्यानें चित्ताला स्वास्थ्य मिळून कथेच्या श्रवणाला विशेष मदत होत असेल, तर केव्हांही भोजन करणेंच उत्तम होय. सप्ताहाकडे अव्यग्रता असावी ही मुख्य गोष्ट आहे ॥ ४३ ॥ हे नारदा, सप्ताह-

श्रवणाचें व्रत स्वीकारणाऱ्या लोकांसाठीं आतां कांहीं नियम सांगतों ते ऐक. ज्यांनीं वैष्णवदीक्षेचा स्वीकार केला नाहीं, त्यांना भागवतश्रवणाचा अधिकार नाहीं ॥ ४४ ॥ भागवतकथा श्रवण करणारानें सप्ताह चालू असेतों सात दिवस ब्रह्मचर्य स्वीकारावें, जमिनीवर निजावें, अ णि कथा ऐकून झाल्यानंतर मग पत्रावळीवर जेवावें. आधीं जेवूं नये ॥ ४५॥ द्विदल म्हणजे दोन दल असणारे ( हरभऱ्याची डाळ, तुरीची डाळ वगैरे डाळीचे ) पदार्थ खाऊं नयेत. पक्वान्नादि मधुर पदार्थ, तेलकट पदार्थ, जडान्न, त्याचप्रमाणें स्वभावतः दोषी असलेलें आणि शिळें अन्न खाऊं नये ॥ ४६ ॥ काम, क्रोध, मद, गर्व, मत्सर, लोभ, दम्भ, मोह तसेंच द्वेष या सर्वांचा त्याग करावा ॥ ४७ ॥ वेद, वैष्णव, ब्राह्मण, गुरु, गोरक्षक, स्त्रिया, राजे, महात्मे इत्यादि या सर्वांची निंदा करण्याचें साफ सोडून द्यावें ॥ ४८ ॥ कांदा, गाजर, मध, मसुरा किंवा मसुरांनीं मिश्र असा पदार्थ, कमळांच्या दांड्यांची भाजी किंवा जो पदार्थ भगवंताला नैवेद्य म्हणून अर्पण केलेला नाहीं, असे इतर पदार्थ निषिद्ध असल्यामुळें वर्ज्य करावे ॥ ४९ ॥ ऋतुस्नात स्त्री, अस्पृश्य, चांडालादि लोक, मुसलमान, धर्मभ्रष्ट, संस्कारहीन, त्याचप्रमाणें ब्रह्मद्वेष्टे, वेदबाह्य अशा लोकांशीं संभाषण करूं नये ॥ ५० ॥ खरें बोलावें, शुद्धाचरण करावें, दयाळूपणें वागावें, मौन स्वीकारावें, सरळपणा धरावा, नम्रपणें वागावें व अंतःकरण उदार ठेवावें. भागवतकथा श्रवण करणाऱ्या व्रतस्थानें याप्रमाणें हे नियम पाळले पाहिजेत ॥ ५१ ॥ दरिद्री, क्षयरोगी, दुर्दैवी, पापी, निपुत्रिक, व मुमुक्षु यांनीं ही कथा अवश्य ऐकावी ॥ ५२ ॥ जी ऋतुस्नात होत नसेल, जिला पुत्र होऊन मृत होत असतील किंवा जिला अजिबात पुत्रच होत नसेल, किंवा जिला एकच पुत्र झाला असेल, वा जिचा गर्भच नेहमीं पतन पावत असेल, अशा स्त्रियांनीं आणि पुरुषांनींही ही भागवतकथा अत्यावश्य करून पूर्वोक्त विधींनुसार श्रवण करावी. तेणेंकरून त्यांना अविनाशी अशा फलाची प्राप्ति होईल. अत्युत्कृष्ट अशी ही भागवतकथा कोटि यज्ञांचें फळ देणारी आहे ॥ ५३, ५४ ॥ याप्रमाणें या भागवतकथापारायणव्रताचें विधिपूर्वक आचरण करून नंतर उद्यापन करावें. भागवतकथाश्रवणाच्या फलाची इच्छा करणाऱ्यांनीं कृष्णजन्माष्टमीच्या व्रताचें जसें आपण उद्यापन करितों, त्याप्रमाणें ह्या भागवतकथाश्रवणाचें उद्यापन करावें ॥ ५५ ॥ दारिद्र्यामुळें एखाद्या भगवत्भक्ताला उद्यापन करण्याची शक्ती नसेल तर त्यानें तें करूं नये. कारण, ज्याअर्थी त्यांनीं निष्काम होऊन भागवतकथांचें श्रवण केलें आहे, त्याअर्थी ते वैष्णव केवळ श्रवणानेंच निष्पाप झाले आहेत. मग त्यांना आणखी उद्यापनाची आवश्यकता ती कशाला ? ॥ ५६ ॥ याप्रमाणें हा सप्ताहयज्ञ समाप्त झाल्यानंतर श्रोत्यांनीं भागवतग्रंथाची व वक्त्याची अत्यंत भक्तियुक्त अंतःकरणानें पूजा करावी व इतर श्रोत्यांना प्रसाद म्हणून तुळशीच्या माळा वांटाव्या. नंतर मृदंग वाजवून तालसुरावर सुंदर कीर्तन करावें ॥ ५७, ५८ ॥ " जय जय जय " " नमः नमः " असा शब्द वारंवार उच्चारावा व त्याचप्रमाणें शंखनादही करावा. नंतर ब्राह्मण व याचक यांना द्रव्य व अन्न द्यावें ॥ ५९ ॥ श्रोता जर वैराग्यसंपन्न

असेल तर त्यानें सप्ताहसमाप्तीचे दुसऱ्या दिवशीं व्रताची सांगता होण्यासाठीं गीतापाठ करावा. श्रोता जर गृहस्थाश्रमी असेल तर त्यानें होमहवन करावें ॥ ६० ॥ होमविधिप्रमाणें दुधाची खीर, मध व तूप आणि तीळमिश्रित असें अन्न, ह्यांनीं युक्त असा हविर्भाग तयार करून दशमस्कंधाच्या प्रत्येक श्लोकागणिक एक एक हविर्भाग या मानानें श्लोकोच्चारपूर्वक हवन करावें ॥ ६१ ॥ किंवा वरील हवनीय द्रव्याच्याच हविर्भागानें गायत्री मंत्राचें पठण करूनही हवन करावें. कारण, वास्तविक पाहिलें असतां श्रेष्ठ असें भागवतपुराण हें गायत्रीमयच आहे ॥ ६२ ॥ होमाचें सामर्थ्य नसल्यास ज्ञानी पुरुषानें हवनाला लागणारे सारे पदार्थ तितक्याच प्रमाणांत, होमफलप्राप्त्यर्थ व श्रोत्या-वक्त्यांमधील दोष दूर व्हावे, तसेंच अनेक कमी पडणाऱ्या गोष्टींचें निरसन व्हावें एतदर्थ योग्य ब्राह्मणांना द्यावे ॥ ६३ ॥ न्यूनाधिकदोषनिवृत्त्यर्थ विष्णुसहस्रनामाचें पठणही करावें. त्यायोगें सर्व कांहीं सफल होतें. विष्णुसहस्रनामाहून दोषनिरसन करणारें दुसरें कांहीं नाहीं ॥ ६४ ॥ नंतर मध व खीर यांचें बारा ब्राह्मणांना भोजन घालावें. भागवतसप्ताहव्रताची पूर्णता व्हावी यासाठीं शक्य असल्यास सुवर्णाची गाय ब्राह्मणाला द्यावी ॥ ६५ ॥ शक्ति असेल तर बारा तोळे सोन्याचा एक सिंह तयार करून त्यावर भागवताचें पुस्तक ठेवून त्याची आवाहनादि सोळा उपचारांनीं दक्षिणेसह पूजा करावी व तें पुस्तक इंद्रियनिग्रही अशा आचार्याला अर्पण करावें. असें करण्यानें तो ज्ञानी पुरुष संसारबंधनापासून मुक्त होतो. याप्रमाणें हें भागवतसप्ताहपारायणाचें अनुष्ठान यथासांग केलें असतां सर्व पातकें नाश पावतात ॥ ६६ ॥ ६७ ॥ ६८ ॥ हें श्रीमद्भागवतपुराण कल्याणकारी व श्रेष्ठ फल देणारें आहे. हेंच धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारहि पुरुषार्थांना मिळवून देण्यास साधनभूत होईल यांत शंका नाहीं ॥ ६९ ॥

सनत्कुमारादि ऋषि म्हणतात—हे नारदा, याप्रमाणें तुला सर्व कांहीं सांगितलें आहे. आतां आणखी तुला काय ऐकण्याची इच्छा आहे? श्रीमद्भागवतानेंच भुक्ति व मुक्ति हस्तगत झाल्यासारखी होते ॥ ७० ॥

सूत म्हणतात, शौनक हो, याप्रमाणें बोलून त्या महात्म्या सनत्कुमारादि ऋषींनीं सर्व पापांचें क्षालन करणारी, भुक्ति व मुक्ति देणारी अशी भागवतकथा सांगितली ॥ ७१ ॥ सर्व लोकांनीं ती इंद्रियनिग्रहपूर्वक सात दिवस विधिपूर्वक श्रवण केल्यामुळें त्यांजवर सर्वश्रेष्ठ परमेश्वर संतुष्ट झाला ॥ ७२ ॥ सात दिवसांच्यानंतर, ज्ञान, वैराग्य व भक्ति यांना अत्यंत पुष्टता प्राप्त झाली; व सर्व प्राण्यांना मोठें मनोहर वाटण्यासारखें लावण्ययुक्त श्रेष्ठ तारुण्यहि प्राप्त झालें ॥ ७३ ॥ आपला मनोरथ सफल झाल्यामुळें नारदालाहि कृतार्थता वाटली व तो ब्रह्मानंदीं निमग्न झाला ॥ ७४ ॥ भगवंताला प्रिय असलेला तो नारदऋषि हात जोडून प्रेमातिरेकामुळें गदगदूलेल्या वाणीनें त्या सनत्कुमारादि मुनींना म्हणाला ॥ ७५ ॥

नारद म्हणालेः—मी आज मोठा धन्य झालों. अत्यंत दयाळू अशा आपणांकडून

मजवर आज मोठा अनुग्रह झाला आहे. आज मला सर्व पापांचें क्षालन करणारा भगवान् श्रीकृष्ण मिळाला ॥ ७६ ॥ अहो तपस्वी ऋषि हो, भागवतश्रवण हें सर्व धर्मांहून श्रेष्ठ होय असें मी मानितों; कारण त्यायोगें वैकुंठांत राहणारा श्रीकृष्ण प्राप्त होतो ॥ ७७ ॥

सूत म्हणतात, वैष्णवश्रेष्ठ नारदमुनि याप्रमाणें बोलत आहे, इतक्यांत भागवत-सप्ताहकथेच्या शेवटीं षोडशवर्षीय, ज्ञानसमुद्राला भरती आणणारा जणूं चंद्रच, व यदृच्छा-लाभसंतुष्ट असा शुकाचार्य फिरत फिरत, तोंडानें भागवतपठण करीत त्या ठिकाणीं आला ॥ ७८ ॥ ७९ ॥ श्रेष्ठ व तेजस्वी अशा त्याला पाहतांच त्याच्या सन्मानासाठीं सारे सभासद तत्काळ उठून उभे राहिले व त्याला त्यांनीं उच्चासनावर आणून बसविलें. नंतर देवर्षि नारदानें प्रेमानें त्या शुकाचार्यांची पूजा केली. नंतर सुखानें बसलेला तो शुकाचार्य म्हणाला;– तुम्हांला मी निष्पाप असा उपदेश करीत आहें, लक्षपूर्वक ऐका ! ॥ ८० ॥

श्रीशुक म्हणतो–'अहो भाविकजनांनो सत्पुरुष हो, अमृतासारख्या मधुर भक्तिरसानें ओथंबलेलें, श्रेष्ठ, सनातन कल्पवृक्षाचें हें भागवतरूपी फळ पोपटाच्या ( शुकाचार्यांच्या ) मुखांतून गळून भूमीवर पडलें आहे. तेव्हां ह्या भावबत रसाचें मोक्षप्राप्ति होईलपर्यंत वारं-वार प्राशन करा ॥ ८१ ॥ या भागवत ग्रंथांत मत्सररहित सत्पुरुषांचा निष्कपट असा श्रेष्ठ धर्म सांगितला आहे. ह्या ग्रंथांत जाणण्यास योग्य व खऱ्या आणि त्रिविध तापांचें निरसन करणाऱ्या कल्याणकारी वस्तूंचें दर्शन केलें आहे. हें श्रीमद्भागवत प्रत्यक्ष वेदव्यासांनीं निर्मिलें आहे. इतर साधनांनीं कितीसा लाभ होणार आहे ? कारण ह्या भागवताचें श्रवण केलें असतां कुशल श्रोत्यांच्या हृदयामध्यें तत्क्षणींच परमेश्वर प्रगट होतो. असें इतर साधनांनीं होणें शक्य नाहीं ॥ ८२ ॥ श्रीमद्भागवत हें सर्व पुराणांमध्यें श्रेष्ठ आहे. वैष्णवांचें द्रव्य हें श्रीमद्भागवतच होय. या भागवतामध्यें परमहंस पदवीला आरूढ झालेल्या साधूंचें निर्मळ श्रेष्ठ ज्ञान गायिलें आहे. ज्ञान, वैराग्य व भक्ति यांसह नैष्कर्म्यसिद्धि यांत प्रगट करून दाखविली आहे. अशा ह्या भागवताचें भक्तीनें श्रवण किंवा पठण करून विचार करणारा मनुष्य मुक्त होतोच होतो ॥ ८३ ॥ हा भागवतरस स्वर्गांत, सत्यलोकीं व कैलासामध्यें, त्याचप्रमाणें वैकुंठांतही मिळणार नाहीं; म्हणून भाग्यवान् पुरुषहो ! तुम्ही ह्याचें प्राशन करा; ह्याला केव्हांहि टाकून देऊं नका' ॥ ८४ ॥

सूत म्हणतात– हे शौनका, याप्रमाणें सभेमध्यें शुकाचार्यांचें भाषण चालू आहे इतक्यांत प्रल्हाद, बलि, उद्धव, अर्जुन वगैरे वैष्णवांनीं वेढिलेला असा श्रीकृष्ण तेथें प्रगट झाला. लगेच नारदांनीं श्रीकृष्णाची व त्या प्रल्हादादि वैष्णवांची पूजा केली ॥ ८५ ॥ नंतर उच्चासनावर विराजमान झालेल्या प्रसन्न अंतःकरण अशा श्रीकृष्णासमोर उभे राहून नारदादि सारे भक्तजन कीर्तन करूं लागले. त्या वेळीं त्यांचें तें कीर्तन ऐकण्यासाठीं पार्वती-सह शंकर व ब्रह्मदेव त्या ठिकाणीं आले ॥ ८६ ॥ त्या कीर्तनामध्यें ताल धरण्याचें काम

प्रल्हादानें स्वीकारिलें होतें, उद्धव झांजा वाजवीत होता, नारदानें वीणा पतकरिली होती, स्वरज्ञानांत प्रवीण असल्यामुळें अर्जुनानें वसंतादि रागांत गाणें गावयाचें आपणाकडेस घेतलें होतें, इंद्रानें मृदंग घेतला होता आणि अशा अपूर्व थाटामध्यें 'जयजय' असा सुंदर ध्वनि उच्चारीत ते सनत्कुमारादि मुनि कीर्तन करीत होते. सुंदर वाक्यरचना करण्यांत कुशल व्यासपुत्र शुकाचार्य तोंडानें प्रेमळ भाषण करीत सर्वांच्या पुढें होता ॥ ८७ ॥ त्या वेळीं त्या कीर्तनांत भक्ति, ज्ञान व वैराग्य हीं तिघें तेजस्वी होऊन नटाप्रमाणें नाचूं लागलीं. अशा प्रकारच्या ह्या अलौकिक कीर्तनानें भगवान् श्रीकृष्ण प्रसन्न झाला व म्हणाला, ॥ ८८ ॥

'आपल्या कथाकीर्तनानें मी प्रसन्न झालों आहें. प्रेमानें आपलासा केलेला अशा माझ्याकडून वर घ्या !' श्रीकृष्णाचें हें प्रसन्नतायुक्त भाषण ऐकून त्या सनत्कुमारादि मुनींचें अंतःकरण प्रेमानें भरून आलें व प्रसन्न चित्तानें ते म्हणाले ॥ ८९ ॥ "हे देवा ज्या ज्या ठिकाणीं हे भक्त भागवतसप्ताहकथांचें पारायण करतील त्या त्या ठिकाणीं तुझें वास्तव्य असावें हाच आमचा मनोरथ तूं पूर्ण कर !" यावर श्रीकृष्ण 'बरें आहे !' असें म्हणाले आणि नंतर ते तेथेंच गुप्त झाले ॥ ९० ॥ पुढें मग नारदानें त्या सनत्कुमारांना, तसेंच शुकाचार्यादि इतर मुनींनाही नमस्कार केला. नंतर आनंदित आणि मोहरहित झालेले ते सर्व तपस्वी भागवतकथामृतानें तृप्त होत्साते आपआपल्या स्थानीं गेले ॥ ९१ ॥ शुकाचार्यानें स्वतः निर्मिलेल्या भागवतामुळेंच, ज्ञान व वैराग्य या पुत्रांसह भक्तीचें रक्षण झालें आणि म्हणूनच श्रीमद्भागवताचें सेवन केलें असतां श्रीकृष्ण वैष्णवाच्या अंतःकरणांत निःसंशय प्रगट होतो ॥ ९२ ॥ श्रीमद्भागवत हें दारिद्र्यरूपी व दुःखरूपी ज्वरानें दग्ध झालेल्या व मायारूपी पिशाच्चानें झपाटलेल्या, तसेंच संसारसमुद्रांत पडलेल्या लोकांच्या कल्याणासाठींच निर्माण झालें आहे अशी सर्वत्र गर्जना चालते ॥ ९३ ॥

शौनक सूताला म्हणतात– हे सूता, शुकाचार्यानें परीक्षित् राजाला हें भागवत कोणत्या काळांत सांगितलें, तसेंच तें पुनः गोकर्णानें केव्हां सांगितलें, ब्रह्मपुत्र सनत्कुमारादि मुनींनीं नारद ऋषीला कधीं सांगितलें, याविषयीं जो माझ्या मनांत घोटाळा उत्पन्न झाला आहे त्याचें तूं निरसन कर ॥९४॥

सूत म्हणतात–शौनका, श्रीकृष्ण निजधामाला गेल्यानंतर कलियुगाचीं तीस वर्षें गेलीं असतां शुकाचार्यानें भाद्रपद महिन्याच्या नवमी तिथीला प्रारंभ करून ही भागवतकथा परीक्षित राजाला सांगितली ॥९५॥ परीक्षित् राजानें ती श्रवण केल्यानंतर कलीचीं दोनशें वर्षें गेलीं असतां आषाढ शुक्ल नवमीपासून गोकर्णानें भागवत सांगण्यास प्रारंभ केला ॥९६॥ त्यानंतर कलीचीं तीस वर्षें गेलीं असतां ब्रह्मपुत्र सनत्कुमारादि मुनींनीं कार्तिक शुक्ल नवमीपासून भागवतकथा वाचण्यास सुरुवात केली ॥९७॥ हे निष्पाप शौनका, ह्याप्रमाणें जें जें कांहीं तूं मला विचारलेंस तें तें सर्व कांहीं तुला सांगितलें. शौनका, कलियुगांत भागवतकथा संसाररोगाचा नाश करणारी आहे ॥९८॥ अहो

सत्पुरुष हो, हें भागवत कथानक श्रीकृष्णाला प्रिय असून संपूर्ण पातकांचा नाश करणारें आहे. मुक्ति मिळविण्याला हें श्रेष्ठ साधन असून भक्तीला क्रीडा करावयास लावणारें आहे. तेव्हां ह्या अशा अपूर्व कथामृताचें तुम्ही मोठ्या आदरानें प्राशन करा. अन्य तीर्थांचें सेवन करून कांहींही उपयोग होणार नाहीं ॥९९॥ यम, यमपाशधारी आपल्या दूतांच्या कानाशीं लागून सांगतो कीं, " हे दूत हो, भागव त्कथामृताच्या प्राशनानें मत्त झालेल्या पुरुषांना तुम्ही सोडून द्या. भगवत्कथामृताचें प्राशन न करणारांवरच माझी सत्ता चालते; वैष्णवभक्तांवर चालत नाहीं " ॥१००॥ अहो, ज्यांत कोणत्याहि प्रकारचें सार नाहीं, अशा ह्या तुच्छ संसारामध्यें विषयरूपी विषाच्या सेवनानें ज्यांची बुद्धि व्याकुल झाली आहे असे तुम्हीं स्वतःचें कल्याण व्हावें यासाठीं निदान अर्धा क्षण तरी शुकाचार्यांनें वर्णिलेल्या भागवतकथामृताचें प्राशन करा. अन्य निंद्य व निरुपयोगी मार्गांत कशासाठीं उगीच फिरतां ? तुम्हांला मुक्ति हवी असेल तर ती या भागवताच्या श्रवणानेंच फक्त मिळेल. अन्य मार्ग निरुपयोगी होत. परीक्षित राजाला ह्याजबद्दल विचारा म्हणजे तो पुराव्यानिशीं तें सिद्ध करून देईन ॥ १०१ ॥ भक्तिरसाच्या प्रवाहांत राहणाऱ्या श्रीशुकाचार्यानें ही भागवतकथा सांगितली. ही कथा ज्यानें आपल्या गळ्यांत बांधिली आहे, जो तिच्यांतच संलग्न झाला आहे, तो साक्षात् समर्थ विष्णु होतो ॥ १०२ ॥ याप्रमाणें अत्यंत गुप्त, अनेक शास्त्रें अवलोकन करून त्यांतील सर्व सिद्धांतांनीं सिद्ध झालेलें असें हें भागवतमाहात्म्य तुम्हांला मी सांगितलें आहे. ह्या जगांत भागवतकथेहून दुर्लभ असें दुसरें कांहीं नाहीं. ह्यासाठीं अत्यंत सुख मिळण्याकरितां बारा स्कंधांमध्यें वर्णिलेलें असें जें भगवत्कथासार त्या भागवतवर्णित भगवंताच्या कथासाराचें तुम्ही सेवन करा ! ॥ १०३ ॥ जो कोणी नियमविधिपूर्वक ह्या भागवतोक्त कथेचें उत्तम तऱ्हेनें श्रवण करितो अथवा भक्तीनें शुद्ध अशा वैष्णवांसमोर कथन करितो ते दोघेही त्यायोगें मोक्षाला जातात. ह्या भागवताच्या योगें खरोखर पाहिलें असतां ह्या लोकीं असाध्य अशी कोणतीही गोष्ट नाहीं ! ॥ १०४ ॥

**श्रीपद्मपुराणांतर्गत भागवतमाहात्म्य समाप्त**

---